कॉन्टिनेंटल् प्रकाशन......५०

# व र्षा

शांता ज. शेळके, एम्. ए.




१९४७

अडीच रुपये



माझे आवडते कवि

**कै. माधव ज्यूलियन**

यांना

आदरपूर्वक

अर्पण



# मनोगत

गेल्या सात-आठ वर्षांत वेळोवेळीं लिहिलेल्या कवितांपैकीं कांहीं कवितांचा हा संग्रह आज मी वाचकांना सादर करीत आहे. इंग्रजी चौथ्यापांचव्या इयत्तेंत असतांना 'रविकिरण मंडळा' चीं पुस्तकें वाचून काव्याविषयींचें कुतूहल व प्रीति हीं प्रथम माझ्या मनांत निर्माण झालीं. मला काव्य अतिशय आवडतें, जुन्यानव्या कवींपैकीं बहुधा प्रत्येकाच्याच कवितेनें माझ्या काव्यप्रेमाला थोडा-बहुत हातभार लावलेला आहे. परंतु विशेषतः 'माधव ज्यूलियन्' यांच्या कवितेनें मला अतिशय मुग्ध केलें. माझ्यांतील काव्यात्मतेचें पुष्कळसें संगोपन माधव ज्यूलियनांच्या काव्यामुळें झालें आहे.

या श्रेष्ठ कवींच्या प्रत्यक्ष परिचयाचा लाभ दुर्दैवानें मला कधींच होऊं शकला नाहीं. मी त्यांना पाहिलेलेंहि नाहीं. माधव ज्यूलियनांच्या कवितेविषयीं मला वाटणाऱ्या अपार प्रेमाचें व कृतज्ञतेचें अल्प चिन्ह म्हणून माझा हा पहिला कवितासंग्रह मी त्या कवीस आदरपूर्वक अर्पण करीत आहे.

माधव ज्यूलियनांनंतर माझे एक आदरणीय गुरु प्रा० माटे यांच्या प्रोत्साहनाचाहि मला येथें उल्लेख करावयास पाहिजे. माझ्या सर्व वेड्यावांकड्या लिखाणाचें त्यांनीं वेळोवेळीं जाणि मनापासून कौतुक केलें आहे. त्यांच्या निरतिशय वात्सल्यामुळें मला कितीदांतरी उत्साह आणि स्फूर्ति लाभलेली आहे.

प्रा० रा. श्री. जोग यांची आपल्या काव्यसंग्रहाला प्रस्तावना लाभावी अशी इच्छा आज कित्येक दिवस मी मनांत बाळगलेली होती. प्रा० जोग यांनीं मला इतकें लोभानें व आपलेपणानें वागावलेलें आहे कीं आपल्या पुस्तकाला त्यांची प्रस्तावना मागतांना मला कसलाहि संकोच वाटला नाहीं. ' वर्षा ' ला त्यांची प्रस्तावना लाभण्याचा योग जुळून आलेला बघून मला अतिशय आनंद होत आहे.

आणि एकंदरीत आनंदाच्या भावनेनेंच आज मी माझा कवितासंग्रह वाचकांपुढें ठेवीत आहे. लेखनाच्या बाबतींत मी अत्यंत भाग्यशाली आहे असें मला वाटतें. मी जें लिहिलें त्याचें—गुणांच्या मानानें—पुष्कळच चांगलें स्वागत झालें. माझ्या कवितेबद्दल अनेक सुहृज्जनांनीं जिव्हाळा व आपुलकी दाखवली. कुणी प्रतिकूल टीकाहि केली. हे सर्वजण आपापल्या परीनें मला उपकारकच ठरले आहेत. त्या सर्वांचें मी येथें आभार मानतें.

खुद्द माझ्या कवितेबद्दल मी कांहींच सांगूं इच्छित नाहीं, विशिष्ट अनुभूतींचीं स्मारकें म्हणून आणि विशिष्ट आकांक्षांचीं चित्रें म्हणून माझ्या कविता मला आवडतात. एक गोष्ट मात्र येथें सांगावीशी वाटते. मी जें कांहीं लिहिलें तें अगदीं मनापासून लिहिलें आहे. त्यांत उणीवा असतील, दोष असतील, पण अप्रामाणिकपणा यत्किंचितहि नाहीं.

दि. ११-९-४७
अत्रे प्रिंटिंग प्रेस, मुंबई

—शान्ता ज. शेळके



## स्वागतम्

आपल्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेसाठीं माझें नांव शान्ताबाईंनीं कितीतरी दिवसांपासून राखून ठेवलें होतें. त्याचें कारण मला अद्यापि उमगलेलें नाहीं. वस्तुतः कवीनें ( म्हणजे येथें कवयित्रीनें ) स्वतःच आपल्यास काय सांगावयाचें आहे तें सांगून टाकावें असें माझें मत आहे. किंबहुना आपल्या काव्यामध्येंच तें सांगून झाल्यावर निराळें असें निवेदन तरी कशास हवें असें मला वाटतें. पण तें हवेंच असें जर लेखिकेस वाटत असलें, तर मजसारख्या मध्यस्थाची गरज कशासाठीं ? कदाचित प्रस्तावनेच्या जाळ्यांत एका फाजील चिकित्सेखोर टीकाकाराला अडकवून टाकण्याचा हा कवयित्रीचा डाव असेल अशीहि एक शंका माझ्या मनांत डोकावून गेली. परंतु माझें त्यांच्या काव्याविषयींचें अनुकूल मत शान्ताबाईंना माहीत असल्यानें हीहि शंका फार वेळ राहिली नाहीं. तेव्हां केवळ एका ज्येष्ठ व्यक्तीचा पुरस्कार आपल्या कवितेस लाभावा एवढ्या साध्या इच्छेनेंच त्या प्रवृत्त झाल्या असाव्या असें मी समजतों.

आणि त्यांच्या कवितेचा पुरस्कार मी अत्यंत मनःपूर्वक करितों. खरोखर शान्ताबाईंच्या कवितेच्या बाबतींत मी खऱ्या अर्थानें मध्यस्थ नाहींच. त्यांची कविता मला आवडते, आणि मनापासून आवडते. तिच्यामध्यें जी सहजता आणि प्रसन्नता आहे ती आजकालच्या इतर काव्यांत क्वचितच पहावयास मिळते. तीमध्यें त्यांच्या मनांतील अर्थ अगदीं स्वच्छपणें प्रतिबिंबित झालेला असतो. तो समजावून घेण्यासाठीं तिजबरोबर झटापट करावी लागत नाहीं. आजकालचा प्रतीकवाद आणि त्यामुळें निर्माण होणारें गूढगुंजन तीमध्यें मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें आणखीहि एक गोष्ट मला त्या कवितेमध्यें आवडली ती अशी कीं कवयित्रीच्या मनांत वाचकाला कांहींहि शिकवावयाचें नाहीं, म्हणजेच कोणत्याही प्रकारचें प्रेषितांचें आवसान तिनें आणलेलें नाहीं. तिसरी समाधानाची गोष्ट अशी कीं शान्ताबाईंना आपल्या कवितेमध्यें कोणत्याहि प्रकारचा क्रांतिकारकत्वाचा अधिकार सांगावयाचा नाहीं, कीं वाचकाला धक्के देऊन त्याला जागृत करण्याची महत्त्वाकांक्षाहि त्यांनीं धरलेली नाहीं त्यामुळें स्फुलिंग, अंगार, ज्वाला, स्थंडिल इत्यादि आजची अतिपरिचित मंडळीहि तीमध्यें भेटत नाहींत. आणखीहि एका गोष्टीचा उल्लेख करावयाचा म्हणजे मराठी वाङ्मयांत डोकावूं पाहाणाऱ्या विकट

( Grotesque ) पूजेचा या कवितेवर कांहींहि परिणाम अद्यापि झालेला नाहीं. आणखी शेवटीं सांगावयाचें म्हणजे या कवितेंत मोकळा शृंगार पुष्कळच असला तरी नव्यानें येऊं पाहाणारा लिंगसंप्रदाय तीमध्यें मुळींच नाहीं. आहे तो केवळ, सरळ, शुद्ध, निरागस आत्माविष्कार आहे. म्हणजेच तीमध्यें 'असामान्य' असें कांहीं नसून ती बहुधा सामान्यांच्याकरितांच लिहिलेली असावी.

स्वतः शान्ताबाईंनीं आपल्या कवितेचें ( किंवा स्वतःचें ) जें वर्णन करून ठेवलें आहे तें या शेवटच्या वाक्यांतील वर्णनाशीं जुळतें आहे. ' गगनोदरांतील मेघांचीं पटलें भेदून संचार करणारा गरुड आपण नसून, हिरवळींत जेथें कोमल फुलें बहरतात तेथें झुलणारे फुलपांखरूं असल्याचें ' त्यांची कविता सांगत आहे. ' आपल्या तळपण्यानें घन तिमिराला उजळून टाकणारी विद्युल्लतिका आपण नसून गगनांगणांत दिसणाऱ्या ढगाच्या आडून चमकणारी इवलीशी चांदणी आपण आहोंत ' असें तिचें म्हणणें आहे. ' उद्दाम सुगंध उधळणाऱ्या गुलाबकलिकेपेक्षां पर्णान्तरीं लपून राहणारी तुळशीची मंजरी ' ती आहे. दुंदुभीप्रमाणें आसमन्त घुमविणारें हें सागरगार्जित नसून तो निर्झराचा अस्फुट कलरव आहे. तें द्वेषाचें तांडव नसून चिमण्या गालांवरील अकारण हास्याची ती माधुरी आहे. स्वतःच्या आणि स्वतःच्या काव्याच्या मर्यादा आणि गुणविशेष दुसऱ्या कोणाहि कवीस इतक्या नेमक्या आणि सुंदर रीतीनें सांगतां आल्या नसत्या. बहुधा त्या मर्यादा व ते गुणविशेष त्यांना समजलेलेहि नसतात. कारण आत्मपरीक्षणाची ही कला सर्वांना, आणि विशेषतः कवींना, साधलेली दिसत नाहीं.

हें आत्मनिरीक्षण त्यांनीं दुसऱ्याहि एक कवितेंत केलें आहे. आपल्या हृदयाचें पांखरूं भारी अस्थिर, चंचल असून त्याला आवरावें कसें हें त्यांना समजत नाहीं. तें हृदय अत्यंत काव्यात्म आहे. नील नभ दिसतांच अधीर होऊन तें फडफड करूं लागतें, आणि आपल्या इवल्याशा पंखांनींच गगन भरूं पाहतें. कोठें बहरलेला ताटवा दिसला कीं त्याला फार हर्ष होतो, व त्याचें अस्फुट, कोमल गुंजन सुरूं होतें. त्याला कोणी आपल्या जातीचें म्हणजे काव्यात्मवृत्ति असें भेटलें कीं त्याला बिलगून शब्दहीन भाषेमध्यें त्याच्याशीं तें हितगुज करूं लागतें. त्या हृदय-पांखराच्या नयनांत अनंत स्वप्नें फुलून बसलेलीं आहेत, व त्या स्वप्नांच्या माधुरींत जीवनाची कटुता तें विसरून जातें. या स्वप्नांचांच आधार आपल्या अभागी जीवास असल्याचें शान्ताबाईंनीं दुसरीकडे

सांगितलें आहे व त्या स्वप्नांवाचून जीवित दुःसह झालें असतें असेंहि त्या म्हणतात. हीं स्वप्नें म्हणजेच त्यांची कविता होय. रात्र संपून प्रभात आली व स्वप्नमालिका संपून गेली, तरीहि त्या स्वप्नांची स्मृति ठेऊन त्यांत आपलें मन रंगवून चंडांशुचें दारुण ऊन सहन करण्याची आपली तयारी असल्याचेंहि त्यांनीं आणखी एका कवितेमध्यें लिहिलें आहे. या स्वप्नांच्या नादीं लागून आपण काव्यांतील जीवनांतच रंगून गेलों व त्यामुळें जीवनांतील काव्याला मुकलों असल्याची जाणीवहि त्यांनीं व्यक्त केली आहे. तथापि हा स्वप्नाळूपणा त्यांना सोडीत नाहीं व आपलीं अमूर्त स्वप्नें जीवनांत नसलीं तरी कवितेमध्यें मूर्त झालीं असल्याचा निर्वाळा त्यांनीं शेवटीं दिला आहे.

या स्वप्नाळू वृत्तीमुळें स्वतःचें जीवन दुःखी झालें असल्याचें कवयित्रीस समजत नाहीं असें नाहीं. ' कांहीं अमूर्त ध्येयांचा, वेध सारखा घेऊन ! कापीतसे जीव उगा वाळवंट हें वैराण ' असें आपलें जीवन चाललें असल्याचें तिला माहीत आहे. याला जबाबदार आपणच असल्याचेंहि तिला मान्य आहे असें ' माझें मीच घेतलें हो मरण हें ओढवून ! ध्येयें दूरच राहिलीं आयु चाललें सरून ' या ओळींवरून स्पष्ट होतें. अशा वेळीं ' वृथाच मी जीवनाचा चालविला अट्टाहास ! श्रेय कांहीं ये न हातीं, मन मात्र हो उदास ' असे नैराश्याचे उद्गारहि ती काढते. असें असूनहि मी ' माझा मार्ग ' सोडावयास तयार नाहीं असें शान्ताबाई सांगतात. हा मार्ग म्हणजे एक दारुण योग आहे, त्या मार्गावर दाहक अग्नि लागतो, पण जे कांहीं क्षण उत्कट असे लाभतात, त्यांतील माधुरी कांहीं आगळी असते. त्यांतील उन्मादाची चटक ज्यांना लागली त्यांना सरळ मार्गावर आणणें कठिण आहे. म्हणून ' मी वेड्यापरि हिंडणारच सदा ' असा त्यांचा हट्ट चालूच आहे. या परिस्थितींत कलन्दराचें जीवन त्यांना मोठें आकर्षक वाटतें. पण कलन्दराचें बाह्य जीवन एक वेळ स्वीकारतां आलें, तरी त्याची आंतरिक वृत्ति अंगीं बाणणें सोपें नसतें. कमळपत्राप्रमाणें अलिप्त वृत्तीनें जीवनाचा अनुभव कवयित्रीला घेतां आलेला नाहीं. ( तसें करतां आलें असतें तर काव्यनिर्मितीचें कारणहि उरलें नसतें. ) आणि म्हणून ' सदाच मी एकली, जीवनीं सदाच मी एकली ' अशी रुखरूख त्यांना लागून राहते. मग ' नको उभविणें नूतन सृष्टि, नको व्हावया फिरून कष्टी ' असे कलन्दर-वृत्तीशीं विसदृश असे निराशेचे उद्गार त्यांच्या मुखांतून निघतात.

पण त्यांच्या काव्यांत निर्भेळ निराशा नाहीं, किंबहुना ती कमीच आहे असें म्हणतां येईल. जीवनांतील सुखाकडे सुख म्हणूनच त्या पाहूं शकतात. नैराश्यांतहि त्यांना एक आधार वाटतो व तो म्हणजे ईश्वरावरील श्रद्धेचा. कविजनांच्या अलीकडील पिढीमध्यें न आढळणारी परमेश्वरावरील श्रद्धा त्यांच्या काव्यांत प्रकट झाली आहे. बुद्धीपेक्षां श्रद्धेवर त्यांचा अधिक भर आहे. मूर्तिभंजकांच्या या युगांत मूर्तिपूजेचें आणि तीपाठीमागील भावनेचें त्यांनीं समर्थन केलें आहे. तेजोनिधि भास्कर, पर्जन्याच्या धारा, वसन्ताचें आगमन, सुमनांचा सुगन्ध, भव्य सागर या गोष्टींमध्यें प्रभूचा साक्षात्कार क्षणाक्षणाला त्यांना होतो, व त्यामुळेंच क्वचित् ' आज सरे मम एकाकीपण ' असेंहि त्यांना वाटतें. प्रभूच्या साक्षात्काराचें क्षेत्र म्हणूनच जणूं कांहीं, अथवा स्वतंत्रपणेंहि, शान्ताबाईंना निसर्गाचें प्रेम फार वाटतें व त्यांतल्या त्यांत वर्षाऋतूचें आकर्षण अधिक दिसतें. ' पाऊस, ' ' हिरवळ ', ' पावसानंतर ' इत्यादि कविता याच्या द्योतक आहेत. आपल्या काव्यसंग्रहास ' वर्षा ' हें नांव त्यांनीं याकरितांच दिलें असावें लिम्बाला उद्देशून लिहिलेल्या कवितेंत ' स्नेहभाव आम्हांतील नाहीं कुणां कळायचे ! ज्ञात आहे आम्हांलाच मुग्ध नातें हें आमुचें ! ' असें त्या म्हणतात. पण त्या आणि निसर्ग यांच्यामध्यें असणारा हा ' आंतरः कोऽपि हेतुः ' मुळींच गूढ राहिलेला नाहीं. शान्ताबाईंना वाटणारा निसर्गाविषयींचा प्रेमभाव हा कवींचें कर्तव्य म्हणून आलेला दिसत नाहीं; मूळचा व जिव्हाळ्याचा दिसतो. निसर्गदर्शनानें ज्या हृदयाला इतका प्रामाणिक आल्हाद वाटतो, त्या हृदयाला विकृतीचें भय वाटावयास नको.

शान्ताबाईंचें व्यक्तित्व हें या स्वरूपाचें आहे. त्याचा सुंदर अविष्कार करावयास आवश्यक असणाऱ्या शब्दार्थांची त्यांच्याजवळ असणारी उपस्थिति आणि त्यांचें पद्यरचनेवरील प्रभुत्व हीं दोनही खरोखर कौतुकास्पद आहेत. आधुनिक कवयित्रींमध्यें कोणाहिमध्यें हें प्रभुत्व इतक्या प्रमाणांत मला दिसलें नाहीं, एवढेंच नव्हे तर अनेक कवींमध्येंहि तें दिसत नाहीं. विषय सुचला कीं त्याला अनुरूप असे शब्द आणि अर्थ त्यांना सहजच स्फुरतात असें वाटतें. केवळ एवढ्याच सामग्रीवर कित्येक लोक कवि म्हणून मिरवतात. मग त्याबरोबरच उत्कट भावनेच्या जिव्हाळ्याची देणगी ज्यांना लाभली आहे, त्या शान्ताबाईंनीं आपल्या कवित्वाचा अभिमान बाळगावयास कोणतीच हरकत नाहीं. त्यांच्या

काव्याचें खरोखर तेंच अधिक महत्त्वाचें भूषण आहे. त्याला बाह्य रचनेचें कोंदणसुद्धां त्यास अनुरूपच सुंदर आहे. एवढेंच येथें सांगण्याचा हेतु आहे.

आपली कविता ही आपल्या जीवनांतील समाधान आहे अशी शांताबाईंची भावना आहे. जेव्हां जेव्हां हृदयांत हर्ष दाटून येऊन त्यांच्या मनांत मधुर भाव उसळले, तेव्हां तेव्हां ते त्यांनीं कवितेमध्यें ओतून दिले. दुःखाचा कटु चषक घेऊन नियति जेव्हां त्यांच्या दारीं आली तेव्हांहि कवितेचा आश्रय करून तिची सारी कटुता त्यांनीं सहन केली. जीवनाला उजळा देत ज्यावेळीं प्रीति-रति उदय पावला, त्यावेळीं आपल्या हृदयींचा उन्माद त्यांनीं आपल्या कविते-मध्यें सांगून टाकला. जीं गुज किंवा मूक लाजऱ्या भावना त्यांना जगापासून लपवून ठेवाव्या लागल्या, त्याहि त्यांनीं कवितेमध्यें ग्रथित केल्या. बाह्य जगाला विटून चित्त अन्तर्मुख होई, त्यावेळींहि कवितेबरोबरच त्यांनीं हितगुज केलें. किंबहुना त्यांचीं अमूर्त स्वप्नें कवितेमध्यें मूर्त झाल्याचें त्यांनीं पाहिलें. ज्या कवितेनें त्यांच्याकरितां इतकें केलें त्या कवितेचा आणि त्यांचा स्नेह ( तो युगायुगांचा आहे असें त्या म्हणतात ) या जन्मापुरता तरी चिरंतन राहो अशीच कोणाहि रसिकाची इच्छा राहील. प्रौढपणीं कवितेविषयींचा हा स्नेहभाव कमी झाल्याचीं किंवा अजिबात लुप्त झाल्याचीं उदाहरणें त्यांच्या डोळ्यांपुढें कांहीं थोडीं थोडकीं नसतील. त्यांनीं स्वतःहि इतर लेखनाकरितां कथा कादंबरी इत्यादि गद्य वाङ्मयप्रकारांचा आश्रय केलेला आहेच. या नवीन ओळखीमुळें जुन्या स्नेहांत अंतराय पडण्याची रसिकांना वाटणारी भीति त्यांनीं खोटी ठरवावी अशी रसिकांच्या वतीनें मी त्यांना सूचना करितों. तसें त्यांनीं न केलें तर आज प्रिय रसिकाला त्यांनीं केलेल्या विनंतीमध्यें विशेष अर्थ नाहीं असें म्हणावें लागेल.

पुणें
१८।८।४७

–रा. श्री. जोग



# अनुक्रमणिका

# मी

[ जाति : लीलारति ]

मेघांचीं पटलें भेदुनि गगनोदरीं
संचार करी तो गरुड नसे मी परी—
बहरलीं जिथें हिरवळींत कोमल फुलें
मी फूलपांखरूं झुलें तिथें चिमकुलें !

लखलखून उजळी घन तिमिराला अशी
मी विद्युल्लतिका नसे कुणी उर्वशी,
ढग एक परी जो दिसतो गगनांगणीं
चमकतें तयांतुन इवली मी चान्दणी !

उद्दाम उधळिते सुगन्ध श्वासांतुनी
ती गुलाबकलिका नाहीं मी मानिनी,
लाजुनिया बसतें लपून पर्णान्तरीं
मी साधीभोळी तुळशीची मंजिरी !

दुंदुभीपरी जें आसमन्त घुमवित
तें गभीर नाहीं मी सागरगर्जित,
नाचतो परी जो कड्यांतुनी निर्झर
मी कलरव त्याचा अस्फुट अन् मर्मर !

द्वेषाचें नाहीं भयकर मी ताण्डव
क्रोधाची नाहीं ज्वाला मी अभिनव,
जें फुलें अकारण चिमण्या गालांवरी—
त्या हास्यामधली केवळ मी माधुरी !

# हे अधिराज

[ जाति : भूपतिवैभव ]

लखलखतें सुंदर सिंहासन सोनेरी
त्वन्मूर्ति अधिष्ठित शोभे त्यावर भारी.
तव पूजक वेढिति तुजला चहुंबाजूंनीं
मी अंग चोरुनी उभी दूर या कोनीं !

नानाविध वाद्यें सुरेल घेउनि हातीं
गुणगान तुझें त्यावरी कुणी करितातीं.
कुणि गर्जुनिया तव करिती जयजयकार
हो लुप्त त्यामध्यें अस्फुट माझा सूर.

घालिती कुणी तव कण्ठीं सुंदर माला
तव शिरीं वाहती कुणी फुलांचा झेला.
अंजली कुणी अर्पिती तूझिया चरणीं
चिमुकलें सुमन मम करींच जाय सुकोनी !

सोन्याचीं तबकें भरुनि हिऱ्यामोत्यांनीं
आणिलीं तुझ्यास्तव उपायनेंही कोणी
नेत्रांतिल एका अश्रुबिंदुवांचून
तुज अर्पाया प्रभु मजजवळीं कांहीं न !

या भक्तांनीं तुज वेढियलें अधिराजा
मग कळते का रे मूक तुला मम पूजा ?

# विफल आस

[ अभंग ]

तुझिया भेटीची घरूनिया आस
तुझ्या मंदिरास आलें नाथा.
क्रमियेला मार्ग किती घाईघाई
उत्कंठा हृदयीं तीव्र दाटे
तुझ्या दर्शनाचा बघाया सोहळा
पंचप्राण गोळा झाले नेत्रीं
श्रीमुख देखून संतुष्ट होईन
मस्तक ठेवीन पायांवरी
घट्ट कवळून गोजिरीं पाउलें
आंसवांच्या जलें न्हाणीन मी.
हृदयीं दाटले अनन्त उमाळे
करीन मोकळे तुजपाशीं
याचसाठीं माझा आसावला जीव
घेतली मी धांव तुजकडे
हाय ! परी तुझें बंद हें कवाड
दर्शनाच्या आड येई सख्या
दूर हें व्हायचें कधीं अन्तराय
कधीं तुझे पाय लाभणार?
स्वहस्तेंच देवा कवाड खोलून
देशील दर्शन कधीं बरें !
नको नको माझा अंत बघूं आतां
धांवून अनन्ता भेटी देई !

## पाऊस

पावसाच्या धारा
येती झरझरा
झांकळलें नभ, वाहे सोंसाट्याचा वारा.

रस्त्यानें ओहळ
जाती खळखळ
जागजागीं खांचांमध्यें तुडुंबलें जळ.

ढगावर वीज
झळके सतेज
नर्तकीच आली गमे लेवुनिया साज

झोंबे अंगा वारे
काया थरथरे
घरट्यांत घुसूनिया बसलीं पांखरें

हर्षलासे फार
नाचे वनीं मोर
पानांतून हळूं पाहे डोकावून खार

पावसाच्या धारा
डोईवरी मारा
झाडांचिया तळीं गुरें शोधिती निवारा

नदीलाही पूर  
लोटला अपार  
फोफावत धांवे जणू नागीणच थोर

—झाडांची पालवी  
चित्ताला मोहवी  
पानोपानीं खुलतसे रंगदार छवी

थांबला पाऊस  
उजळे आकाश  
सूर्य येई ढगांतून, उधळी प्रकाश

किरण कोंवळे  
भूमीवरी आले  
सोनेरी त्या तेजामध्यें वस्तुजात खुलें

सुस्नात जाहली  
धरणी हांसली  
वरुणाच्या कृपावर्षावानें सन्तोषली !

# इथें

[ जाति : समुदितमदना ]

आम्रतरू हा धरी शिरावर प्रेमळ निज साउली
मृदुल, कोंवळी, श्यामल हिरवळ पसरे पायांतळीं
आणिक पुढतीं झरा खळाळत खडकांतुन चालला,
साध्याभोळया गीतामध्यें अपुल्या नित रंगला !

कांठीं त्याच्या निळीं लव्हाळीं डुलती त्यांचे तुरे
तृणांकुरावर इवलालीं हीं उडतीं फुलपांखरें !
खडा पहारा करिती भंवतीं निळेभुरे डोंगर
अगाध सुंदर भव्य शोभतें माथ्यावर अंबर !

दुर्मिळ ऐशी देइ शांतता सदा मला हें स्थल
ऐकू न येई इथें जगाचा कर्कश कोलाहल.
व्याप जगाचा विसराया मी येइ इथें सत्वर
अर्धोन्मीलित नयनीं बघतें स्वप्नें अतिसुंदर.

शान्तविल मी तप्त जिवाला इथें कितीदां तरी
कितिदां यावें तरी येथली अवीट ही माधुरी !

# सृष्टि आणि मी !

[ छंद : देवीवर ]

निळ्या नभाचा विस्तार
दिसे गवाक्षामधून
ऊन कोंवळें सोनेरी
ओसण्डतें तयांतून.

शुभ्र कापसासारखे
मेघ नभीं तरंगती
डोंगरांच्या देहावर
खुले निळी रम्य कान्ती

कडुलिम्बावर फुले
मृदु, हांसरा मोहर
मत्त, मादक सुगन्ध
उधळितो दूरवर !

फूलपांखरें नाचरीं
झेंपावती फुलावर
दुरुनीच अस्फुट ये
गोड गीताची लकेर !

पलिकडे कुरणांत
बाळें खेळतीं गोजिरीं
सूर त्यांचे उल्लासाचे
चढतात वाऱ्यावरी.

## व र्षा

सारी सृष्टी चैतन्यानें
हर्षोत्फुल्ल झाली वाटे,
हाय ! औदासीन्य मग
माझ्याच का मनीं दाटे ?

# हिरवळ

[ जाति : भूपतिवैभव ]

वर्षाची पहिली पर्जन्याची धारा
न्हाणुनिया गेली भूमिभाग हा सारा
लागली खुलाया अन् आतां तिजवरतीं
या तृणांकुरांची हिरवी, कवळी नवती

किति उल्लासानें डोलतात हीं पातीं
इवलालीं सुन्दर फुलें मधूनी खुलतीं
चिमुकलीं फूलपांखरें डुलति मौजेनें
पाहुनी चित्त मम भरून ये हर्षानें.

जणुं गालिचेच हे अन्थरले भूवरतीं
जडविले जयावर दंवबिन्दूंचे मोती
या शाद्वलांगणीं वाटे लोळण घ्यावी
अन् सस्यश्यामल भूमी ही चुंबावी.

चैतन्य किती या उसळे तृणपर्णांत !
किति जीवनरस राहिला भरोनी यांत !
जो झटे येवढा तृणासही सुखवाया
किति अगाध त्याच्या असेल हृदयीं माया !

# लिम्ब

[ छंद : देवीवर ]

निळया निळया आकाशाची
पार्श्वभूमी चेतोहर
भव्य वृक्ष हा लिंबाचा
शोभतसे तिच्यावर.

किती रम्य दिसे याचा
पर्णसंभार हिरवा
पाहतांच तयाकडे
लाभे मनाला गारवा.

बलशाली याचा बुंधा
फांद्या सुदीर्घ विशाला
भय दूर घालवून
स्थैर्य देतात चित्ताला.

उग्र जरा परी गोड
गन्ध मोहरास याच्या
कटु मधुर भावना
जणु माझ्याच मनींच्या.

टक लावून कितीदां
बघतें मी याच्याकडे
सुखदुःख अंतरींचें
सर्व करीतें उघडें !

माझ्या नयनांची भाषा
सारी कळते यालाही
मूक भाषेंत आपुल्या
मज दिलासा तो देई.

स्नेहभाव आम्हांतील
नाहीं कुणा कळायाचे
ज्ञात आहे आम्हांलाच
मुग्ध नातें हें आमुचें !

# तान्हुल्या मीनाक्षीस

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

नेत्रांचीं तुझिया सतेज दिसतीं मीनाकृती हीं दळें
' मीनाक्षी ' तव नांव ठेवुनि गमे औचित्य की साधिलें
कैसें शोभतसें ललाट चिमणें हें अर्धचन्द्राकृती
केसांच्या कुरळ्या जयावर बटा सोत्कण्ठ झेंपावती.

केला स्पर्श कुणी हनूस तुझिया गे अंगुलीनें जर
ओठांच्या मृदु पांकळ्या विकसती हांसावया सत्वर
गालीं या इवल्या खळ्या बघुनिया दाटे मनीं कौतुक
चुंबावें गमतें पुनःपुनरपी हें गोजिरें त्वन्मुख.

हास्यानें तव चित्तवृत्ति आमुच्या सानंद होती, पण—
हा तूझें रडणेंहि सौख्यदच्च गे ! आश्चर्य हें काय न ?
क्रीडा बालिश या निरागस तुझ्या पाहून चित्ताप्रती
होई हर्ष, अतीव रम्य गमते ही तापदा संसृती !

मातें ज्ञात न ईशरूप, नच मी अद्यापि त्या पाहिला
हा किंचित् परि तो प्रतीत तुझिया बालस्वरूपीं मला !

# गोविन्दाग्रजांच्या 'निर्दय बाले'स

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

कांहीं दिव्य, उदात्त, उज्ज्वल असें देई यदा दर्शन
साक्षात्कारच दिव्य होउनि तदा होतो कवी उन्मन
बुद्धी तीव्र तुझी, मनोहर तसें सौंदर्य हें देखुनी
सौन्दर्यातुर हा कवी सहज की गेला खुळा होउनी.

सर्वस्वासह अर्पिलें हृदय गे त्यानें तुला आपुलें
प्रीतीचें सुकुमार पुष्प तुझिया पायांवरी वाहिलें
तूझें प्रेम मिळेल ही वसतसे आशा तयाच्या मनीं
त्या स्वप्नांतच राहिला निशिदिनीं वेड्यापरी गुंगुनी

तों ( कैशी नकळे ! ) निरर्थ गमली ती प्रीतिपूजा तुला
जातां स्वप्न विरून भोंवति तया अन्धारची दाटला
नैराश्यांतुन तीव्र त्या प्रगटलीं काव्यें मनोवेधक
जीं वाचून सहस्र जीव कविचे त्या जाहले पूजक

अश्रूंचीं प्रतिवर्षि ते उधळितीं पुष्पें समाधीवरी
त्यांनीं आग विझेल काय परि ती, जी त्याचिया अन्तरीं

# अपुरें स्वागत

[ जाति : चंद्रकांत ]

देहावरती बहुमोलाचे वस्त्रालंकार
लेवुनिया तुजसाठीं केला मोहक शृंगार
फुलें वेंचिलीं रम्य, तयांची गुंफुनियां माला
करीं घेउनी सज्ज जाहलें तुझ्या स्वागताला

येतांना तुज दुरुन पाहुनी हर्ष मना झाला,
मधुस्मितानें तुझ्या टाकिलें मोहुनिया मजला !
क्षण झालें नेत्रांचें मीलन,—तूं गेलास पुढें
न्याहळीत तरि होते तुजला डोळे मम वेडे !

मूर्ती तव अदृश्य जाहली, आणि तया कालीं
चित्तवृत्ति स्थिर होउनि मम भानावर आली.
आणिक नन्तर कळलें मातें, कीं तुझियासाठीं
गुंफियली जी माला—पडली ती नच तव कंठीं !

# योगायोग

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

योगायोग जुळून ये म्हणुनिया हो आपुली ओळख,
तें संभाषण मोजकेंच पहिलें झालें किती सौख्यद !
' जातों ! ' हांसत सांगुनी निघुनिया गेलास तूं जेधवा—
' आतां भेट कधीं फिरून ? ' वदलें, होऊन पर्युत्सुक.

हो वृद्धिंगत ज्यापरी शशिकला ती शुक्लपक्षांतली
मैत्रीची अपुल्या कमान चढती झाली तशी प्रत्यहीं.
रात्रीची कलिका प्रभातसमयीं व्हावी प्रफुल्ला, तशी—
स्नेहाची सखया ! पुढें परिणति प्रीतीमधें जाहली !

ज्योत्स्नेच्या सुषमेंत विश्व अवघें होतें तदा रंगलें
होता नीलनभीं शशांक हंसरा, संपूर्ण, स्निग्धप्रभा
साक्षी ठेवूनिया तयास, धरुनी हातांमध्यें मत्कर
गांभीर्यें वदलास, ' येथुन पुढें संगें क्रमूं जीवन ! '

—योगायोगच आणि आज फिरुनी दूरावितो आपणां
दैवाची जर ही कठोर करणी, कां दोष देऊं कुणा ?

# हे मांडून समोर ग्रंथ

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

हे माण्डून समोर ग्रंथ बसलों, अभ्यासहेतू मनीं—
त्यांच्यांतील विचारवैभव परी चित्ता न घे वेधुनी.
या सन्ध्यासमयींच तूं प्रतिदिनीं येतेस माझ्याकडे
ठावें, अध्ययनीं रमेल मग का मच्चित्त हें बापुडें ?

दारीं पाउल वाजतां मज गमे आलीस तूंची सये,
होतो जीव अधीर आणि वळती दाराकडे नेत्र हे.
वाटे येइल गे क्षणीं रव तुझा कानांवरी मंजुळ
पाहूनी परि अन्य कोणि जन मी होतों हृदीं व्याकुळ !

एकामागुन एक तास निघुनी जाती कसे सत्वर
जाई वेळ तसें अधीकच सखे ! हो खिन्न हें अंतर
लोपे आस, हळू हळू भरतसें नैराश्य चित्तामध्यें
तूं येणार न, निश्चयें कळुन हें मी आपुल्याशीं वदे—

" झाला श्रान्त ! क्षणांत भास्कर अतां होणार अस्तंगत—
जीवा शान्तविण्यास या पण गडे ! कोठें तुझी संगत ? "

# प्रीतिगीत

तूं होइ सख्या वनमाळी
मी होइन राधाबाळी
धरुनिया बांसरी अधरीं गा मधुगीतें
प्रीतीचे मंजुळ बोल ऐकवी मातें

मी होइन सुमन सुरंग
ये होउनिया तूं भृंग
खुलवीन आपुलें हृदय सख्या तुजपुढतीं
ने खुशाल लुटुनी तयांत भरली प्रीती.

हो तरुवर वा रानांत
मी लतिका होइन तेथ
तव देहाभंवतीं विळखा मम घालोनी
उधळीन प्रीतिचीं सुमनें तुझिया चरणीं

मी होइन सुमनीं गन्ध
हो तूंहि समीरण मन्द
तव करीं गुंफुनी निजकर मी येईन
ही सोडुन अवनी गगनांतरि विहरेन

तूं होइ गडे रविकिरण
मी दंवबिन्दू होईन
तेजाचें चढवी आभूषण मम देहीं
मी विलीन अन्तीं होइन रे तुजठायीं !

# भविष्याचें सुख !

श्रान्त देह शान्तवाया पुढें लाभेल सराई
आज मात्र सांवलीला नाहीं झुडूप कोठेंही !
पुढें तृषा निवाराया लाभणार थण्ड जल
आज मात्र ताहनेनें जीव जाहला व्याकुळ.

पुढें स्नेहाळ नेत्रांचें मज लाभेल स्वागत
आज मात्र पत्थरांची येथें निर्जीव सोबत.
पुढें देतील मायेचे करस्पर्श संजीवन,
आज मात्र उदास मी सहृभावनेवांचून !

मधुसंगीत देईल पुढें चैतन्य जीवास
आज मात्र एकतें मी येथ माझेच निःश्वास !
लाभतील तेव्हां पुढें लाभोत हीं सौख्यें सारीं–
आज मात्र विषण्णता दाह चित्ताचा या करी !

# प्रीतीचा प्रांतकार

[ जाति : माधवकरणी ]

जीवन माझें रूक्ष कष्टमय, उरामध्यें माझ्या
जळतसे रात्रंदिन आग
तुझ्या मात्र जीवनीं उदेली प्रभात नुकतीच
बहरली कोमल फुलबाग !

तीरावरतीं क्षण थबकोनी शोभा लाटांची—
बघावी, हेंच तुला ठावें
तुफान खवळे, फुटकी नौका–तीवर नावाडी
परन्तू केलें मज दैवें.

पानांआडुन मुग्ध हांससी, कळी कोंवळी तूं
आणि मी तरुवर वठलेला
संग वांच्छिसी माझा, परि मी कसा तुझ्या अधरीं—
धरूं गे दुःखाचा पेला ?

कठोर माझ्या स्पर्शानेंही क्षणांत करपेल
सुमासम मृदुला तव काया
अस्फुट कोमल कळी–हवा कर बालार्काचाच
तियेच्या फुलवाया हृदया !

तुझिया नयनीं आस नाचते, माझ्या नयनांत
निराशा सदा दाटलेली,
तुझिया अधरीं हास्य चमकतें, परि माझ्या हृदयीं—
चालली सदा दुःखकेली !

## वर्षा

जीवनमेघा कडा रुपेरी तुझिया प्रीतीची
   लाभली, भाग्य हेंच थोर
मुग्ध जीवनीं तव कालविणें दुःखाचें जहर—
   घडो नच पातक हें घोर !

भग्नमूर्तिचें व्यर्थ कशाला पूजन करिसी या—
   आपुल्या प्रीतीच्या सुमनीं ?
शोध चंद्रमा दुजा, जयाच्या स्निग्धमधुर तेजें
   पौर्णिमा फुलेल तव नयनीं !

# सांत्वन

[ गझल : देवप्रिया ]

आणिसी वेडे ! कशाला आंसवें हीं लोचनीं ?
जें घडेना कां तयाची ठेविसी आशा मनीं ?
प्रीति केली हाच हेतू ठेवुनी चित्तामध्यें—
की तियेची पूर्तता होईल अन्तीं मीलनीं.

ईश्वरेच्छा ना तशी हें आज आलें प्रत्यया,
गूढ हेतू कोण त्याचे शक्त घ्याया जाणुनी ?
जीविताच्या वाळवंटीं गोड पुष्पें हांसलीं,
बाग आला मोहरोनी, ही तुझी गे मोहनी !

खिन्नतेचे मेघ जेव्हां दाटले चित्तामध्यें
तूझिया नेत्रांत तेव्हां लाभली संजीवनी
ओतुनी प्रीतीजिव्हाळा अन्तरीं माझ्या तुवा—
निर्मिलें चैतन्य, तूझा कां न मी होऊं ऋणी ?

आज संसारीं नव्या जासी, तिथेंही हो सुखी,
मात्र जा गे विस्मरोनी प्रीतिगाथा ही जुनी !
आणि मी—राहीन आतां मग्न तूझ्या चिन्तनीं,
श्रेय माझें दैवही घेणार ना हें काढुनी !

# याचना

[ जाति : माधवकरणी ]

सुमनांचा या बहार लुटणें नाहीं मम दैवीं
असें तें सुदैव अन्याचें
दूर उभे राहून परी मज सुगन्ध घेऊं दे
त्यांत मज समाधान साचे !

दृढालिंगनें तुझीं लाभणें अन्य कुणालागीं
तयाचा विषाद नच मजला;
स्नेहाचा कर पाठीवरुनी फिरवशील जर का–
तेंच की गमेल भाग्य मला !

प्रीतीचीं उन्मत्त भाषणें तव अन्यासाठीं
तयाचा हेवा नच मातें,
सहानुभूति स्रवे जयांतुन असे तुझे बोल
तृषित मी ते ऐकायातें !

स्निग्ध नयनशर खुशाल अपुले फेंक दुज्यावरती
तयांची आस न मम चित्तीं
ओथंबुनि आंसवें जाहले जड दृष्टिक्षेप,
तेच गे पडोत मजवरती !

सुखी तूं तरी सौख्य मातें
दुःख तव जाळित हृदयातें
विचित्रच्च हें अपुलें नातें
तेंच परन्तु सदैव राहो, ही तुजला विनति
स्मृती मम ठेव सदा चित्तीं !

# संध्याकाळ

शान्ति सर्व घेउनिया सन्ध्या ही आली
बैस गडे ! जवळ जरा या निवान्त कालीं !

मावळला सूर्य, विश्व अंधारुन आलें
कोलाहल थांबवुनी स्तब्ध विहग झाले
स्पंदनही सरितेच्या हृदयिचें निमालें
धूसरल्या गिरिमाला दूर अन्तराळीं !

तम टाकी झांकळून आसमन्त सारा,
लुकलुकते नीलनभीं एकच ही तारा
कुरवाळुनि जाय हळू शीत, मन्द वारा
तप्त मना विनवी जणुं हास्य तुझ्या गालीं !

कष्टुनिया दिनभरि ये उभयांना शीण
व्याप सकल ते आतां जाउं विस्मरून
ये ! माझ्या स्कंधावर टाक जरा मान
नेत्रांची चालू दे गूढ, मूक बोली !

बागेश्री होउनिया मम संसाराची
बाग तुवां रम्यमधुर फुलवियली साची
आर्पिलीस देवी ! मज सुमनें मोलाचीं
भाग्यदेवता मम का तुजविण निराळी ?

# तेव्हां आणि आतां

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

कांहीं सुंदर कल्पना चमकल्या जेव्हां मनीं माझिया
काव्यें त्यांवर मी रचून सखया ! वेगें तुला दाविलीं
काव्याचे गुण अंगभूत नव्हते त्यांच्यामध्यें लेशही
ती साधी रचनाच पाहुन परी हो हर्ष तूंतें किती !

काव्यें तीं मम वाचुनी कितितरी केलें तुवां कौतुक
जें ऐकूनच धन्य धन्य मजला चित्तीं तदा वाटलें
तेव्हांपासुनि हाच छन्द जडला वेड्यापरी मन्मना
होता काव्य रचूनिया प्रथम कीं तें दाखवावें तुला.

होती त्या सहजीवनांत अपुल्या काव्यात्मता केवढी !
चर्चा, वादविवाद रम्य अथवा काव्यें कधीं वाचिलीं
केव्हां हास्यविनोद आणि कथिलीं गूजें मनीचीं कधीं
तो होसी प्रतिकूल तूंच—नि पुढें दूरावलों आपण !

आतांही रचितेंच काव्य, परि तें दावूं कुणा वाचुनी ?
तूं नाहींस म्हणून आज सखया ! हीं आंसवें लोचनीं !

# ओझरती दृष्टिभेट

क्षणभर भेट आपुली झाली !
परिचय अपुला नाहीं झाला
नजर मात्र भिडली नजरेला
खुणा आंतरिक पटुनी कांहीं हंसूं उमटलें गालीं.

गूढभाव नेत्रांत तरळले
रहस्य अपुलें अपणां कळलें
अनोळखीपण आड कशाला येइल मग त्या कालीं ?

जरी भेटलों जनसंम्मर्दीं
तरी लोपुनी क्षणि ती गर्दी
एकान्तच निर्माण जाहला तें अपुल्याभंवतालीं !

दिठी दिठीला क्षणभर मिळली
अस्फुट वचनें ओष्ठीं स्फुरलीं
आणि विजेची चमक जणूं कीं देहामधुनी गेली.

दूर उभा तूं जरि मजपासुनि
अन्तर मधलें गेलें तुटुनी
स्पर्शसुखाची दुरून आपण अनुभविलीच नव्हाळी !

परिचय अपुला नसोच नसला
लौकिक परिचय हवा कुणाला
युगायुगांची क्षणांत जर का जिवास ओळख पटली ?

भेट न होवो पुन्हां कधींही
दुःख तयाचें वाटत नाहीं
अज्ञात सख्या ! चिरकाल तुला जागा हृदयीं दिधली !

# मनीषा

सहज मिळे त्यांत जीव तृप्तता न पावे
जें सुदूर, जें असाध्य तेथें मन धांवे !

भेदुनिया गगनाला
लखलखते जी चपला
तेज तिचें वाटे कीं हृदयीं कवळावें !

पर्वत जो उंच उभा
चुम्बितसे नील नभा
शिरिं त्याच्या कीं सलील वाटे विहरावें !

सांध्यमेघ सोनेरी
विलसति जे क्षितिजावरि
गमतें की सुंदर त्या मन्दिरीं रहावें !

रजनीच्या कृष्णपटीं
नक्षत्रें झगमगतीं
भव्य दिव्य वैभव तें वाटे भोगावें.

जेथ बुद्धि, जेथ धीर
जें अथांग, जें गभीर
हृदयीं त्या अवगाहन वाटतें करावें !

## श्रद्धा आणि बुद्धि

[ जाति : समुदितमदना ]

श्रद्धा जों जों पूजास्थानें मजलागीं दाविते
बुद्धी त्यांतिल दोष नेमके शोधुनिया काढिते !

श्रद्धा पाहे परमेशाचा घ्यावयास आसरा
बुद्धी शंकित होउनि बोले ' आहे का तो खरा ? '

प्रीतीमध्यें विलीन व्हाया श्रद्धा हो आतुर
त्या प्रेयांतिल व्यंगें लाविति बुद्धीला हुरहुर.

श्रद्धा निर्भयपणें धांवते ध्येयामागें यदा
बुद्धि तेधवा बसे न्याहाळित अंतिम त्या आपदा

बुद्धी आपुले पायबन्द नच शकेल घालूं जिला—
भोळी, सुन्दर, निर्भय श्रद्धा मिळेल का ती मला ?

# पावसाळी रात

[ साकी ]

पदराखालीं झांकुनिया जग घेइ निशा घनघोर
झिम झिम पाउस बरसे, झालें नभही काळेभोर,
निद्रावश जन झाले अवघे, नांदे शान्ति दिशांत
मात्र मिणमिणे पणती अजुनी ही माझ्याच घरांत.

हात देउनी चौकटिला, दारांत उभी राहून
करितें आहे अशी प्रतीक्षा मी केव्हांपासून
तुषारबिंदू घेउनि संगें झुळुक येइ अवचीत
भरे कांपरें देहाला अन् होतें मी भयभीत !

मध्येंच होई गूढ कशाची सळसळ ही पानांत
नानाविध मग शंका जाती डोकावून मनांत.
वीज चमकते क्षणभर तीच्या प्रकाशामध्यें क्षीण
निर्जन रस्ता सरळ दीर्घ हा वाटे अधिक भयाण

कोण यायचें आज घरीं मम या मार्गावरतून–
खरें सांगतें ! तेंही मजला नाहीं ज्ञात अजून.
मात्र एवढें खरें, उभी मी राहुनिया दारांत
बघतें आहे वाट सारखी, जरि हो इतुकी रात !

## प्रभात

स्वप्नमालिका सरे अतां ही !
उधळित होता चंद्र सुधेला
रातराणिला बहार आला
धुन्द करी तो गन्ध मनाला
निशा अतां ती विलुप्त होई !

त्या सुन्दर चन्देरी रातीं
सुखें पहुडतां शय्येवरतीं
निद्रामीलित नयनांपुढतीं
तरंगलीं स्वप्नें सुखदायी.

रजनीच्या बागेंत गोजिऱ्या
स्वप्नांच्या विकसल्या मंजिऱ्या
रूपगुणें किति सुंदर साऱ्या
पाहुनिया मन भुलुनी जाई !

स्वप्नफुलांचा सुगंध पिउनी
जीव खुळा हा क्षणीं होउनी
भरभर चढला नभोवितानीं
स्मरण न त्या जगताचें राही

आणि तोंच—ही रजनी सरली
नयनांपुढचीं स्वप्नें विरलीं
क्षितिजावरतीं प्रभा पसरली
लख्ख उजळल्या दिशा दहाही

सरलें स्वप्नांचें अनुरंजन
निशा संपली, ये आतां दिन
चराचरीं ओताया जीवन
तेजोभास्कर गगनीं येई !

स्मृती परि स्वप्नांची ठेवून
तयांत अपुलें रंगवुनी मन
आतप चण्डांशूचा दारुण
सुखें दिनभरीं साहिन मीही !

# नको तूं झळकूं सौदामिनी !

[ जाति : केशवकरणी ]

नको तूं झळकूं सौदामिनी !
मिणमिणती ही पणती माझी तीच करीं घेउनी
मार्ग हा जाइन मी चालुनी

तूं क्षणीं चमकसी मेघोदर भेदुनी
परि लुप्त होउनी जासी अन्य क्षणीं
चंचलता ऐशी भरली तव जीवनीं
अशा तुजवरी कसा विसंबुनि राहूं मायाविनी ?

मी सौंदर्यातुर भुललों तुज पाहुनी
उरिं कवळाया धांवलों बाहु पसरुनी
कटु सत्य परी हें अन्तीं ये उमगुनी
की भूवरचा मी, आणिक तूं गगनस्था कामिनी !

नागिणीसारखा साज तुझा मोहक
हें रूप ओतितें विखार जणूं दाहक
क्षण दावुनि अपुले विभ्रम उन्मादक
जासी निघुनी, आणि भासते उदास मग यामिनी !

लाविसी घडिभरी आशा वेड्या मना
चिरकाल जिवाला देसी परि यातना
तूं निष्ठुर ऐशी असशी गे अंगना !
तेजानें तव पथ कैसा मम उजळणार जीवनीं ?

ही पणती यास्तव घेतों आतां करीं
उज्ज्वलता तुजसम नाहीं इजला, तरी
किति स्निग्ध, शान्त विलसतें तेज अंतरीं
दाहि दिशा मम हिनें उजळिलया या अंधारांतुनी

जरि अल्प हिचे हे असती तेज:कण
टाकिला तयांनीं पथ माझा उजळुन
मी मत्स्नेहाचें आर्पिन तिज जीवन
तीच मला नेईल पार या झंझावातांतुनी
प्रीतिनें अपुल्या सांभाळुनी !

# विज्ञापना

[ जाति : समुदितमदंना ]

'येइन' म्हणसी तरी सुखें ये सखया माझ्या घरीं
नकोस आणूं संगें अपुलीं अमित वैभवें परी.
बहुमोलाचीं वस्त्राभरणें घालि न देहावर
लपुनी जाइल त्याखालीं तव स्नेहपूर्ण अन्तर !

नको शिरावर मणिकांचनमय किरीट तो राजस
पाहुनि त्यातें स्तिमित होउनी जाइल मन्मानस
आणुं नको संगतीं आपुलीं अफाट सेनादलें
सामावुनि दोघांसच घेईल अंगण मम चिमुकलें !

वैभवशाली लवाजमा तव येउ नको घेउनी
झोंपडींतली दरिद्रता मम जाइल रे लाजुनी
तव ऐश्वर्या देखुनिया हे दिपतिल मम लोचन
आणि बावरुन जाइल माझें साधेंभोळें मन !

वैभवयुत सम्राट कुठें तूं—आणि कुठें दीन मी !
कळतें सारें, तरी प्रेम हें लवहि न होई कमी !
ये माझ्यास्तव वैभव अपुलें दूर जरा सारुनी
तरीच येइल धीर जरासा माझ्या वेड्या मनीं.

विश्रब्धपणें ठेवुनि मग हें शिर तव वक्षावरी
कथीन सारें हृद्गत तुजला लपलेलें या उरीं !

# स्वप्न आणि जागृति

[ जाति : समुदितमदना ]

जीव रमतसे निशिदिनि माझा स्वप्नांच्या मंदिरीं
नेत्र उघाडितां दिसे भोंवतीं भयाण वास्तव परी !
स्वप्नांमधलें क्षणीं लोपतें पुष्पित नन्दनवन
आणि लागतें दिसूं रान हें कंटकयुत दारुण
स्वप्नांतिल गायनें प्रीतिचीं,—सुन्दर त्यांचे स्वर
विरुनी त्यांतुन ऐकूं येतें आक्रंदन भेसुर !
करपाशांच्या सुंदर माला, कटाक्ष ते मादक—
लोपुनि तेथें वाहूं लागे अश्रुपूर दाहक !
स्वप्नांतिल तें अपार वैभव, सुखमय तें जीवन
जागा त्यांची क्षणीं घेतसे कठोर समरांगण !
स्वप्नांमध्यें अज्ञात सुखें गळां घालिती मिठी
जागृतींत परि शय्येवर मी तळमळतें एकटी !

कधीं न ये अनुभूति जयांची निष्ठुर या जीवनीं—
फसवीं स्वप्नें रंगविते कां निद्रा तीं मन्मनीं ?

# क्षण घेतलेंस तूं

[ जाति : भूपतिवैभव ]

क्षण घेतलेंस तूं मज अपुल्या करपाशीं
धरिलेंस कवळुनी मजला निजहृदयाशीं
ठेविलेस माझ्या ओठांवरती ओठ—
क्षण जीवनांत मम झाला तो अविनाशी !

धडधडत्या वक्षा मिळतां तव आधार
जाहले मनांतिल विकल्प सारे दूर
तव ओष्ठसम्पुटीं मुख जातां झांकून
मधु·सुखलहरींनीं भरून आला ऊर !

दृढ मिठी तुझी ती पडतां देहाभंवतीं
उन्मादभरें नयनांचीं मिटलीं पातीं
क्षण वितळुन गेली धरणी पायांखालीं
अन् जीव तरंगत गेला वरतीवरती !

जाहली उरांतिल धडधड क्षणभर बंद
तुटलेच भंवतिचे वास्तवतेचे बन्ध !
रोमांचित झाली काया स्पर्शें तुझिया
अन् दिशादिशांतुन फुले नवा आनंद !

कोलाहल भंवतीं झाला होता शांत
स्वप्नें मधु घेउन आली होती रात,
चन्द्राची लपली कोर ढगांच्या मागें
त्या क्षणीं जाहला अपुला तो एकान्त !

त्या क्षणीं थांबलें भ्रमण जणूं पृथ्वीचें
त्या क्षणीं थांबलें स्पंदन दो हृदयांचें
युगयुगें जन्मलीं क्षणांतुनी त्या दिव्य
अन् मीलन झालें आतुर दोन जिवांचें !

नव्हतोंच राहिलों उभे जरी कुंजांत
तरि मधुर गंध भरुनिया येइ हृदयांत
नव्हतेंच भोंवतीं छेडित कोणी वीणा
तरि नाचुं लागलें चित्तीं मधुसंगीत !

श्वासांत मिळुनिया गेले अपुले श्वास
जाहली शांत क्षणभरी जिवाची प्यास
तें चुम्बन अपुलें एकच गमलें सत्य
अन् जग भंवतींचें केवळ जणुं आभास !

# आज सरे मम एकाकीपण !

[ जाति : भूपतिवैभव ]

आज सरे मम एकाकीपण
तेजोमय हो अवघें जीवन !
उजळित, फुलवित चराचराला
हृदयीं आजि रविराज उदेला
श्रान्त, विकल या मम जीवाला
तेज तयाचें दे संजीवन !
सुवर्ण, आरुण प्रकाश पसरे
हृदयींचे उजळले कोपरे
तम दुःखाचें अखिल ओसरे
चित्तीं स्फुरलें सुन्दर गायन !
काळोख्या जीवनकासारीं
आनन्दाचीं कमळें फुलली
गन्धमाधुरी हृदयीं भरलीं
आणिक गेलें मन वेडावुन !
हे प्रभु ! अपुल्या तेजःकिरणीं
जीवन माझें उज्ज्वल करुनी
कणकण त्यांतिल प्रक्षाळोनी
हरिलें तुम्हीं माझें मीपण !
असेच या पुढतीही देवा !
मम हृदयीं अधिराज्य गाजवा
वियोग अपुला कदा न व्हावा
नातरि टाका तनु ही जाळुन
जाउं नका परि आतां येथुन !

# श्रद्धा

[ छंद : ओवी ]

तेजोनिधी भास्कराच्या
प्रखर या किरणांत
तेज तुझें हो प्रतीत । मजलागीं
आणि पर्जन्याच्या धारा
पृथ्वीवर वर्षतांना
तयांतही भास मना । तुझा होतो.
वसन्ताच्या आगमनें
नटे धरणी अमूप
वैभवीं त्या तुझें रूप । दिसे मातें
सुमनांच्या सुगन्धांत
संगीताच्या वा सुस्वरीं
राहे तुझीच माधुरी । भरूनीया
भव्य सागर पाहतां
होतो विस्मित हा जीव
त्यांत तुझेंच अस्तित्व । जाणवतें
आणि माझ्या अंतरांत
बघतें मी डोकावून
मूर्ती तेथेंही सगुण । शोभे तुझी
असा आंत नी बाहेर
होतां तुझा साक्षात्कार
प्रभो ! माझ्या मना धीर । कां न यावा ?

# पावसानन्तर

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

जोरानें नुकतीच ही सडसडा येऊन गेली सर
गेले पांगुनि मेघ धूसर, दिसे आकाश आतां निळें
झाला सूर्य पुन्हां प्रकाशित, पडे हें ऊनही कोंवळें
रंगांच्या विविधच्छटा खुलुनिया शोभे किती अंबर !

झाले वृक्षहि तृप्त, शीतल, सुखें आनंदुनी डोलती
ओलावून सुरेख हिर्वळ अतां ही हांसते-निर्भर
पाचूंचेच जणूं सतेज हिरवे हे भासती अंकुर
कीं हीं गूढ मनोगतें धरणिचीं बाहेर डोकावतीं ?

सोनेरी मधुहास्य रम्य विलसे सृष्टीचिया आननीं
वेगानें हलवीत पंख अपुले जाती नभीं पांखरें
वाऱ्याच्या झुळका हळू बिलगतां चैतन्य अंगीं भरे
वाटे शीतलतेंत देह निघतो आहे जणूं न्हाउनी !

माझ्याही हृदयांत मेघ असले येती कधीं दाटुनी
ऐशी गोड प्रसन्नता परि तिथें येई न कां मागुनी ?

# दुपार

[ जाति : लीलारति ]

ये माथ्यावर नाभिं आरोहुनि भास्कर
ढग शुभ्र खुलविती निळें गर्द अंबर
रखरखत्या तेजें तृप्त जाहली मही
किति निवान्त वाटे दुपारची वेळ ही !

सुप्तीची जडता येउनि डोळ्यांवरी
रेंगाळत अपुलें काम विश्व हें करी
निःस्तब्ध जाहला अवघा कोलाहल
झुळझुळुनी गाई मात्र नदीचें जळ

पसरलें ऊन हें तरुतरूंच्या वरी
पालवी तकाकित खुले त्यांत हांसरी
परि जाइजुईचीं धवल कोंवळीं फुलें
कोमेजुन गेलीं मिटवुनि अपुलीं दळें

हिरवळींतुनी पाझरती चिमणे झरे
उडतात मधूनी पिंवळीं फुलपांखरें
ध्वनि गूढ कशाचे येती कानांवरी ?
किति मधुर खिन्नता दाटुनि ये अन्तरीं !

## जीवनलहरी

काव्य तुझें वाचुनिया मन माझें हो वेडें
भांडारच रत्नांचें जणुं हो पुढतीं उघडें
क्षण दिपले मम लोचन
बघतांना आणि फिरून
रत्नें तीं लोपुनिया प्रकटलास तूंच पुढें !
× × ×
म्हटलें मी ' भेटशील ज्या समयीं तूं मजला
स्फुरतें जें मम हृदयीं सांगेनच सर्व तुला ! '
भेट तुझी होतां परि
खळबळ किति हो अंतरि
—आणि शब्द ओठांतिल ओठांतच अडखळला !
× × ×
वाटे कीं दावावें हृदय तुला उघडोनी
संभ्रम परि हो चित्तीं, शब्द न ये तोण्डातुनि
आणि तुझ्या नयनींही
गूढ दिसे मज कांहीं
स्नेहभाव कीं रोषच ?—येइ न मज उमगोनी.
× × ×
भेसुर या लाटांचें ताण्डव चाले भंवतीं
निर्जन या बेटावर न दुजे कुणि सांगाती
एकटीच मी येथें
वाट तुझी रे बघतें !
उल्लंघुनि सागर हा येशिल कोण्या रातीं ?
× × ×

मौजेनें खेळ सुरू केला मी आधीं हा
मैत्रीची मात्र तदा होती जीवास स्पृहा
इवल्या परि ठिणगींतुन
ज्वाला उसळे भडकुन
सर्वंकष पावक अन् उठला करण्या स्वाहा !

× × ×

सन्निध तूं असतांना मज न सुचे बोलाया
बघतांही तुजकडेच शान्ति मिळे जीवा या
जासी तूं जैं निघुनी
ये विचार खिन्न मनीं
घटिका ही मोलाची घालविली मी वाया !

× × ×

गेला रवि अस्ताला, झांकळल्या दाहि दिशा
तरुतळिं दडल्या छाया, जगतावर येइ निशा
भंवतीं अंधार पडे
अंधुकला मार्ग पुढें
उजळित हा तिमिर परी, येशिल तूं–मनिं आशा

× × ×

प्रीतीची दाहकता येइ यदा मज कळुनी
म्हटलें कीं ‘ मोहीं या नाहीं पडणार फिरुनि ’
तीच परी ये ज्वाला
कवळाया आजि मजला
नवल किती ? मीहि सजे चुंबाया फिरुनि तिला !

× × ×

# व र्षा

प्रीतीनें दिधला हा शापच कीं रमणीला
' प्रेमासह सुज्ञपणा लाभेल न कधिं तिजला,
आणि स्वप्न तें सुंदर
भग्न कधीं झालें तर--
दुःख आणि वेदनाहि ये तिच्याच वांट्याला ! '

× × ×

हृदयाची वीणा ही मूक असे आजवरी
स्पर्शतांच अंगुलि तव तिजला चैतन्य वरी—
सप्तस्वर आणि अतां
तारांतुनि या निघतां
गीत ऐकल्याविनाच जाशिल का सांग दुरी ?

× × ×

घेशिल तरि घे सखया ! मजला निज करपाशीं
आणि घट्ट इतुकी घे बिलगुनि तव वक्षाशीं—
कीं असह्य त्या मिठींत
दुःखें अवघीं क्षणांत
पूर्वींचीं विरतिल अन् सुख उरेल अविनाशी !

× × ×

खिन्न मनें मी जेव्हां बसतें या खिडकीशी
मूकपणें तरुवर हे डुलती मम दाराशी
हालचाल ती बघतां
शान्ति लाभते चित्ता—
गूढ सहानुभवाचा प्रत्यय ये जीवासी !

# दूर देशींच्या पांखरा

[ छंद : देवीवर ]

दूर देशीच्या पांखरा तुझे ऐकिले मी सूर
आणि अवचित माझ्या भावगंगेला ये पूर
तुझी संगीत माधुरी मज आली ऐकावया
आणि नकळत जडे माझी तुजवरी माया

दूर देशीच्या पांखरा तुझी कीर्ति अनमोल
ऐकतांना मिसळले त्यांत माझे स्तुतिबोल
नव्हतेंच देखियलें रंगरूप तुझें जरी
प्रीती अथांग तरीही उचंबळे माझ्या उरीं !

दूर देशीच्या पांखरा कधीं देशील दर्शन
अशी आशाही कराया धजलें न माझें मन
परी जादू अकस्मात कशी घडे एके दिनीं
निळ्या नभांतून सख्या माझ्या आलास अंगणीं !

दूर देशीच्या पांखरा दारीं देखून तुजला
वाटे स्वप्नच काय हें ? जीव खुळा भांबावला
तुझ्या चरणस्पर्शानें पालवल्या माझ्या वेली
तुझें ऐकतांच गीत मुकीं फुलें उमललीं !

दूर देशीच्या पांखरा अशी जादू घडवून
दुसऱ्याच क्षणीं जासी वेगें गगनीं उडून
निळ्या निळ्या आकाशांत क्षणीं झालास विलीन
स्तिमित मी होतें उभी विसरून देहभान !

## वर्षा

दूर देशीच्या पांखरा घडे नवल जीवनीं
क्षण येऊन गेलास माझी बाग फुलवुनी
आस आतां अन्य कांहीं उरलीच नाहीं मनीं
—तुझे गीतस्वर मात्र येती अद्यापही कानीं !

# माझा प्राजक्त

[ जाति : चन्द्रकला ]

प्राजक्ताचा तरू बहरला माझ्या दारांत
करीत होता नित्य फुलांची भूवर बरसात
लाख चांदणी जशी फुलावी अवसेच्या रातीं
सागरलाटेवरी जसे वा तुषार चमचमती
शुभ्र फुलांचे तसे लेवुनी देहावरि घोस
किती तयानें दिधला माझ्या नयना संतोष !
मन्द, सुगन्धी श्वास तयाचे वाऱ्यावरि येतां
मधुर स्वप्न फुलवुनि जाती क्षण माझ्या चित्ता !
प्राजक्ताचीं याच दरदिनीं सुमनें वेचूनी
वाट तुझी पाहिली सख्या मी आतुरल्या नयनीं.
' आज तरी घ्यावया फुलें हीं येशिल तूं खास '
रोजच माझ्या मनास लागे वेड्यापरि आस.
कधीं न झालें तुझें आगमन परंतु त्या काळीं
खिन्न आंसवें मम नयनांतुन प्रतिदिन ओघळलीं !
आणि आज तूं उभा अचानक माझ्या दारांत--
लाडिकतेनें सुमनासाठीं करुनि पुढें हात !
"'दे दे मजला फुलें तुझीं तीं ' चालविसी घाई
हट्ट तुझा पाहून परी मी भांबावुन जाई.
प्राजक्ताचा बहार गेला कधींच संपून,
तुज अर्पाया फुलें अतां मी आणूं कोठून ?"
बहर संपला निर्माल्यच हें उरलें बघ हातीं
निर्माल्यांतुन मधुगन्धाची येत न अनुभूती !
बहर संपला ! प्रेमळ रसिका जा जा येथून,
सुकलीं सुमनें बघुनि वृथा कां होसी रे खिन्न ?

# भावकणिका

[ जाति : भूपतिवैभव ]

कण काळोखाचे विरले अवकाशांत
तेजांत धरा लागली न्हावया स्नात
गगनांतिल अवघ्या ज्योती झाल्या मन्द
रे ! वियोग-घटिका संन्निध आली, आतां–
अनुभवुं दे क्षणभर तुझ्या मिठीची दृढता

× × ×

भेटलों अचानक दोन मुशाफिर येथें
अन् बसलों बोलत विसरुनिया निद्रेतें
चर्चेंत रूक्ष घालविली सुंदर रजनी !
जायचें अतां परि सोडुनि ही पडशाळा
तें अनुक्त हृद्गत जाळिल नित्य जिवाला !

× × ×

भेटाया आलें तुजला उत्सुकतेनें
जाहलें स्तिमित परि तुझिया औदार्यानें
पाहुनी स्वत:ची उणीव वाटे खन्त
नेत्रांत तुझ्या तों दिसला स्नेह दयाळा
अन् दुर्बलता मम गेली झणि विलयाला !

× × ×

मम नांव काय ? मी असे कोण ? कोठील ?
हा हवा कशाला रूक्ष तुला तपशील ?
अनुभवूं स्वप्न हें आपण तन्मयतेनें
अज्ञातच सखया ! परस्परांना राहूं
अन् पहाट येतां निरोप घेउनि जाऊं !

× × ×

ही वियोग-घटिका येउनि ठाके पुढतीं
आंसवें तरळती कां तव नेत्रांवरतीं ?
छे ! भिजवुं नको हा अन्त्यक्षण अश्रूंनीं !
दे निरोप सखया मज हंसऱ्या ओठांनीं
ती स्मृती मधुर मी ठेविन नित्य जपूनी !

× × ×

मम हृदयावरचें काढुनिया मी रत्न
पूजिले तयानें सम्राटा ! तव चरण
तूं पुससी गर्वें, 'मोल काय गे याचें ?'
जें अमोल त्याचें बघसी मोल कराया ?
हे अश्रू तुजला उत्तर देतिल राया !

× × ×

हा जीवनप्याला हर्षानें भरलेला,
प्यावया जीव हो उत्कंठित तान्हेला
लावितो तयाला तृषाक्रान्त निज ओठ
तों बिंदु विषाचे नियती टाकी आंत
अन् तडफडुनी हो मनुजाचा प्राणान्त !

× × ×

क्षण सौंदर्याचा होतां साक्षात्कार
होतसे मानवी हृदया सौख्य अपार
स्पर्शावें त्याला दुर्दम या इच्छेनें
लावितां हात त्या क्षणांत तें विरुनीया
ये कळून कीं ही मोहक, फसवी माया

× × ×

काळाचा सागर अफाट पसरे भंवती
अन् आपण सारे इथें किनाऱ्यावरती
वेचींत राहतों शंख–शिम्पले क्षुद्र,–
जोंवरी न आली प्रचण्ड पुढुनी लाट
न्यावया आपणां ओढुनि पाताळांत !

# मूक सांत्वन

[ जाति : भूपतिवैभव ]

रविबिम्ब लोपुनी गेलें मावळतीला
अंधार लागला कवळाया अवनीला
कोनांतुन येती धूसर छाया पुढती
तारका एकही क्षितिजावरती नाहीं
तम अथांग आलें दाटुन मम चित्तींही !

तरुपर्णांतुनि हा पिसाट वारा घुमतो
जणुं खिन्न मनोगत अपुलें तरुला कथितो
गातसे नदी निज उदासवाणें गीत
ओथंबुनि आले कृष्णमेघ हे गगनीं
उरि तेजोरेषा ये न तयांच्या दिसुनी

ही उदासीनता पाहुनि ऐशी भंवतीं
कसलेसें काहुर उठतें माझ्या चित्तीं
क्षितिजावर दृष्टी खिळुनि राहते आर्त !
नाकळे कशास्तव इतुकी ही हुरहूर
अन् पुनःपुन्हां कां दाटुनि येतो ऊर ?

ही प्रेमळ, शीतल हिरवळ मूकपणानें
ऐकून घेतसे उदास माझें गाणें
डोलविती माना चिमणीं गवतीं सुमनें
हें फूलपांखरूं सहानुभूती दावी
नयनांतिल अश्रू मंद वातही सुकवी !

वर्षा

हें मूक तरीही सांत्वन कळतें मजला
वाटतें जरा मग समाधान जीवाला
आंसवें तप्त ओघळती नयनांतून
काहूर उरींचें हळहळं हो शान्त
त्या शान्ततेस दे निसर्ग भंवतीं साथ !

ती दिव्य शान्तता भरूनिया हृदयांत
पाउलें घराला मग माघीं वळतात.
निद्रेंत गाढ हा जातो जीव बुडून
हे सख्या निसर्गा ! कोण तुझ्यावांचून
आमुचीं अनामिक दुःखें घे जाणून ?

# मी त्यांत फुलवितें

[ जाति : भूपतिवैभव ]

उद्‌गार भोंवतीं उठति आधिक्षेपाचे
मी त्यांत फुलवितें सुमन तुझ्या प्रीतीचें !
स्वप्नाळ पहिलें मधुवय हें न, जयांत
डोळ्याला डोळा भिडतां खोल उरांत
उसळतात वेडीं स्वप्नें रम्य अनन्त
अवशेषहि आतां नुरले त्या कालाचे !

काहूर भयंकर तें आतां ओसरलें
तें मदिर चांदणें स्वप्नांसह मावळलें
नेत्रांचे चंचल कटाक्षही स्थिर झाले
तों कानीं आले सूर तुझ्या गीतांचे !

आल्हास घेउनी मधु-कवनें सांगातीं
फुलविले जयांनीं रम्य बाग मजभंवतीं
मम गूढ भाव मग उसळुनि आले वरती
कासारीं स्थिर या तरंगावली नाचे

आभास दावुनी कितिदां गेली प्रीत
परि आज तियेचा स्पर्श खरा मज होत
तीं होतीं स्वप्नें, हें तर जीवन मूर्त !
साफल्य जाहलें गमतें आज जिण्याचें !

कुणि म्हणोत 'सारे केवळ वेडेचार'
कुणि म्हणोत 'प्रीति असली ही निःसार !'
मज यांतच वाटे परंतु सौख्य अपार
—कीं भाग्य लाभलें मजला अभिसाराचें !

# घायाळ !

[ जाति : चंद्रकांत ]

कुठुन तरी आलीस अचानक शान्त जीवनीं या
वितरलीस अन् माझ्याभंवतीं निज मोहक माया
प्रीतीचे सुमहार सुगंधी घातलेस कंठीं
त्याहुनि कोमल करपाशांची पडली घट्ट मिठी.
स्मितें कधीं, आंसवें कधीं, कुजबूज कधीं गोड
प्रलोभनें हीं दावुनिया मज लाविलेंस वेड.
मीही नव्हतों स्थितप्रज्ञ वा मुक्त, पशू कोणी—
स्थैर्याचा मम कोट सहज तो गेला ढांसळुनी

आणि अचानक आज लहर तव जाय सखे फिरुनी
आलिस तैशी पुन्हां अचानक जासी तूं निघुनी
त्या सुममाळा भूषविती गे आज अन्य कंठ
ते कोमल करपाश दुजाला आज वेढितात
स्मितें, आंसवें, अस्फुट कुजबुज तशीच आतांही
अन्य कुणा रिझविते, तुझा नच दोष यांत कांहीं !
चांचल्याचा शापच आहे तुझिया प्रीतीला
त्या प्रीतीची रीत परी ही आज कळे मजला
दुःख हेंच वाटे कीं असलें क्षीणजीव सुमन—
व्यर्थ तयानें पूजिलेस कां मग माझे चरण ?
चालतील तोंवरी तुझे हे चालुं देत खेळ
मीच मात्र जन्माचा होउनि गेलों घायाळ !

# कलंदराचें गीत

[ जाति : भूपतिवैभव ]

मी मुक्त कलन्दर, चिरकालाचा पांथ
ही अज्ञातांतुन चालत आलों वाट !

वर नीलनभाची प्रसन्न हंसरी दीप्ती
अन् चरणांखालीं विशाल, सुंदर धरती
तीवरून चालत आलों, जाइन पुढतीं
हें भ्रमण चाललें आहे मम दिनरात !

कधि सराईत मी घेतां क्षण विश्रान्ती
करपाश रेशमी पडले माझ्या कण्ठीं
नयनांत आंसवांसवें रंगली प्रीती
तरि गुन्तलों न मी कधींच त्या मोहांत !

प्राशितां कधीं मदिरेचा मादक प्याला
बेहोष, धुन्द तो कैफ न मातें चढला
केलेंच कण्ठगत आणि वेदशास्त्राला
तरि विरक्तताही बाणली न अंगांत

उपभोगांसम मी उपरतीस मानियलें
मी सुखदु:खांना सदैव दूरच धरिलें
मी समानतेनें विश्व अखिल देखियलें
षड्रिपूंवरी मी केली आहे मात !

घ्याव्यात नवनव्या जीवनांत अनुभूती
संस्कार न त्यांचे उमटूं द्यावे चित्तीं
ही कमलपत्रसम अलिप्त, निर्मम वृत्ती

घेतली असे मी बाणुनिया अंगांत
म्हणुनीच सुखानें गातों नित संगीत
मी मुक्त कलन्दर, चिरकालाचा पांथ
ही अज्ञातांतुन चालत आलों वाट !

---

[ कलन्दर–सुखदुःखांविषयीं समयज्ञ असणारा स्थितप्रज्ञ युयुक्षु ]

## क्षणभर

[ जाति : चंद्रकांत ]

श्वास उष्ण तव अजुन भासती या गालांवरतीं
दीर्घ चुंबनें अजुन तुझीं तीं ओठांवर जळतीं.
पुलक उभारे तुझ्या मिठीचा अजून सर्वांगीं
स्मरणानें तव वीज सळसळे अजुन अन्तरंगीं !

तुझ्या विलासीं नयनीं हंसली उत्शृंखल प्रीत
साथ तिला द्यावया गाइलें मी सुंदर गीत.
स्पर्शानें तव मीपण माझें विस्मृतींत विरलें
आणिक मिटल्या नयनांपुढतीं नन्दनवन फुललें !

अंगप्रत्यंगांतिल यौवन घेतलेंस लुटुनी
मिठींत तव पहुडतां संपली पळामध्यें रजनी
घटकेचें मधुमीलन होतां निरोप घेऊन
क्षणार्धांत पावलास फिरुनी तूं अन्तर्धान !

भ्रमरासम गेलास चुंबुनी पुष्प जीविताचें
चिरविरहाच्या दीर्घ निशेचें दुःख अतां जाचे !
या दुःखांतहि परी सुखाचा लाभ मला होई
अन्धारांतहि प्रकाश माझ्या फुलला बघ हृदयीं.

क्षणभर येउनी सख्या ! केवढी केलिस ही क्रान्ती
उजळुन गेल्या सकलहि आतां मम काजळराती !

# रातराणी

[ छंद : देवीवर ]

रातराणी बहरली बाई ! माझ्या अंगणांत
आणि गोड सुगन्धानें दरवळे आसमन्त !
पौर्णिमेचें चांदणें हें शुभ्र, शीतल पडलें
मन्द वाहतात वारे सुगन्धानें भारावले
वाऱ्यावर तरंगती रातराणींचे उच्छ्वास
माझ्या अन्तरंगीं सख्या तुझ्या भेटीची रे आस
गुच्छ नाजूक हिरवे चिम्ब जाहले दंवानें
माझे नेत्र ओलावले सख्या तुझ्या वियोगानें
येतां झुळूक जोराची थरथरे रातराणी
कांहीं चाहूल लागतां हुरहूर माझ्या मनीं
सारी रात्र अशीच मी येथें बैसलें जागत
प्रियसखी रातराणी करी मजला सोबत
मादक या सुगन्धानें गेलें वेडावून चित्त
तुझ्या भेटीस्तव माझा जीव तळमळे येथ
परी नाहीं रे निर्दया तुझें झालें आगमन
खिन्न वारे भोंवतीं हे करितात आक्रन्दन
चन्द्र फिकट पांढरा गेला कधींच अस्ताला
आला पश्चिमेचा वारा उठवाया जगताला
रातराणीचा सुगन्ध गेला रात्रीसंगें दूर
माझें चित्त निराशलें नयनांत अश्रुपूर !

# जीवन म्हणजेच एक

जीवन म्हणजेच एक दीर्घ विरहगीत
क्षण मीलन, चिर वियोग हीच इथें रीत !

पुष्पगुच्छ बहरवीत
ये वसन्त जीवितांत
मन जों उत्फुल्ल होत—
तोंच होय शिशिराचा हिमस्पर्श शीत !

मधुमीलनरागिणींत
क्षण हो तल्लीन चित्त
तोंच विरहकाल येत
भैरवीच बसतो मग जीव आळवीत !

प्रीतीच्या स्कन्धावर
ठेवुनिया निजतां शिर
जागृति ये क्षणि कठोर
आणि दिसे गेलेली फसवुनिया प्रीत !

अर्पुनिया जीवनभर
कौशल्यें मूर्तिकार
मूर्ति करितां सुन्दर—
काळाचा कर निर्दय भग्न तिज करीत !

अश्रू कां मग्न नयनीं ?
शोकगीत कां वदनीं ?
सांगातीं ये न कुणी !—
चल जीवा एकाकी मार्ग आक्रमीत !

भंवतींचे तोड पाश
हृदयींची सोड आस
क्षणिक येथला निवास-
हंसुनी घे करुनि गोड, हेंच तुज विहीत !

## क्षणक्षणाला

क्षणक्षणाला घडतो प्रभुजी अपुला साक्षात्कार !

गहन तमानें गगन व्यापितां
विषण्णता ये अवघ्या जगता
उजळित येतां मधुस्मितें तों भंवतींचा अंधार !

हृदयीं नैराश्याचें ताण्डव–
चाले, वाटे निरर्थ हा भव
आशारूपें कुठें तरी पण हो अपुला संचार !

कधीं कृपणता येइ मनाला
जीवन वश हो क्षुद्रपणाला
सज्जनचारित्र्यांत प्रकटुनी देतां तैं आधार !

सुमनांच्या कोंवळ्या दलांतुन
बालांच्या वा स्मितहास्यांतुन
तारांच्या तेजांतुन देतां दर्शन वारंवार !

आणि विजेचें स्फुरण भयंकर
सागर पृष्ठीं लहरीसंगर–
भीषणतेंतहि आपुलाच या होतो आविष्कार !

कधिं स्नेहाच्या सौहार्दानें
कधिं प्रीतिच्या करस्पर्शनें
कधें मातेच्या वात्सल्यानें देतां सौख्य अपार !

कणकण अमुच्या आयुष्यांतिल
अपुल्या स्पर्शें झाला मंगल
वृथा कशाला शोधूं अपुली मूर्ती मग साकार !

# एक रात्र

[ जाति : चंद्रकांत ]

निर्मल गगनीं झळकत होत्या तेजस्वी तारा
वाहत होता सुखकर, शीतल, मंद मंद वारा.
उधळित होती मादक अपुला गन्ध रातराणी
तरळत होते मधुगीतांचे स्वर वातावरणीं.

चराचरावर मधुर आपुला मन्त्र घालुनीया
निद्रेनें पसरियली होती निज सुंदर माया
स्निग्ध शान्तता भरली होती दिशादिशांतून
शुभ्र चंद्रिकेंतुनी भासलें जग अस्फुट स्वप्न

नजर फेंकिली गवाक्षांतुनी क्षण मी बाहेर
दृष्टिपुढें तों हांसत आली चंद्राची कोर
आणि पलिकडे दिसे झळकता शुक्राचा तारा
भूवर ओतित निज तेजाच्या स्निग्ध, शीत धारा !

प्रसन्नता ती, आणि शान्तता गभीर देखून
उचंबळुनी आलें क्षणभर मम अन्त:करण.
आणिक नंतर वेड्यापरि मी त्या आवेगांत
कर उचलुनिया नकळे कोणा केला प्रणिपात !

दिव्य कांहिंसें प्रतीत झालें मज त्या दृश्यांत
आणि आंसवें उभीं राहिलीं माझ्या नयनांत
वत्सल मातेपरी भासली मजला ती रजनी !
निद्रा माझी फुलून गेली सुन्दर स्वप्नांनीं !

# अंधारांतील भेट

[ जाति : दयिता ]

मध्यरात्रिला पडे तिच्या दारावरतीं थाप
नवथर जीवाचा झाला भीतीनें थरकांप
धडधडत्या वक्षावरतीं ठेवुनि उजवा हात
कानोसा घेऊं लागे तशीच अंधारांत !

परिचित आली तोंच तिच्या कानांवरती शीळ
सांगे कीं 'या राधेचा दारिं उभा घननीळ !'
भीतीचा लवलेश नुरे त्या सुन्दर नयनांत
भीतीवरती प्रीती ही अशीच करिते मात !

अधीर उत्कंठा हृदयीं ताण्डव करि शिरजोर
तिष्ठत होता बाहेरी तिच्या जिवाचा चोर
माथ्यावरुनी सावरुनी पदर घेतला नीट
दार उघडुनी बाहेरी उभी ठाकली धीट.

मराठमोळा सात्विक ही कुळवन्ताची पोर
निरखुन अंधारांत अशी बघे कुणास समोर ?
परिचित बाहूंचा पडला विळखा तो देहास
आणि मिळाले उभयांचे श्वासांमध्यें श्वास.

अधीर ओठांची झाली क्षण थरथरती भेट
हृदयींचें गुज खोलवरीं जाउनि भिडलें थेट !
आलिंगन तें शिथिल परी झालें दुज्या क्षणास
भंवतींच्या जगताची हो जाणिव धुन्द मनास

अंधारांतच गेला तो शूर तिचा सरदार
खिन्न मनानें परत फिरे ही चन्द्राची कोर
कळ दुःखाची तीव्र उठे तिच्या काळजांतून
गालांवरतीं ओघळलीं आणि आंसवें ऊन

मन्द समीरण भंवतालीं गाई करुणागीत
अन्य कुणा नच कळली ती अंधारांतिल भेट !

# सहवास तुझा जरि

[ जाति : नववधू ]

सहवास तुझा जरि नित्य मिळे
तरि गूढ तुझें मज नच उकलें.
    विशाल सुंदर तुझ्या लोचनीं
    भव्य तुझें व्यक्तित्व देखुनी
    गेलें माझें मानस भुलुनी
अनुरक्त जाहलें प्रीतिबळें !
    तुझिया नयनांतील जळावर
    भाव तरंगति गूढमनोहर
    पर्युत्सुक हो माझें अन्तर
परि अर्थ तयांचा मज न कळे
    निरखुनि बघतें तुझिया नयनीं
    अथांग सागर तों ये दिसुनी
    ठाव तयाचा मजासि लागुनी—
कधिं होईल का भाण्डार खुलें ?
    घेसी मजला जैं करपाशीं
    हर्ष तेधवा भरे मानसीं
    आणि नयन मिळतां नयनांसी
क्षण गमे ऐक्य झालें अपुलें !
    तोंच परन्तु ये दुसरा क्षण
    शिथिल होतसे तव आलिंगन
    घेइ गूढता तुजला वेढुन
चित्तास पुन्हां अन् द्वैत सले !

दुर्दम अन्तर हें ओलांडुन
ये सखया ये वेगें धांवुन
तुझ्यांत मजला घे सामावुन
त्या ऐक्यास्तव मन आतुरलें !

# नयन मिळाले

[ जाति : पादाकुलक ]

नयन मिळाले तव नयनांना
भांबावुनि तों थबके अन्तर
विजेपरी सन्देश गूढ ये
हृदयीं माझ्या फुलवित हुरहुर !

देवघेव शब्दांची झाली
अन् भंवतीच्या अवकाशांत
कणाकणांना फुटुनी वाचा
घुमूं लागलें मधुसंगीत !

हास्य तुझ्या माझ्या ओंठावर
स्नेहाचें जों क्षणभर फुललें
विश्वचि गमलें त्या लहरींवर—
आनंदुनि हेलावुं लागलें !

कर माझे घेउनी निजकरीं
बोललास तूं कांहीं हांसत
वेडावुनि तों स्थिरचर थांबे
प्रीतिसोहळा अपुला देखत !

आणि पुढें माझ्या ओठांना
ओठ तुझे ते स्नेहल भिडले
—जग पूर्वीचें विलया जाउन
नूतन अपुलें विश्व जन्मलें !

# साने गुरुजी

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

शान्तीचेंच करांत खड्ग धरुनी—शस्त्रास जें लाजवी-
आहे भारतभूवरी प्रबळसा संग्राम हा चालला.
स्वातंत्र्यास्तव जे तयांत लढती लक्षावधी सैनिक,
हा त्यांतीलच एक आज दिसतो दृष्टीपुढें माझिया

गेला देह तृणापरी सुकुनिया कारागृहीं कष्टुनि
नेत्रांतील प्रदीप्त ज्योति न परी मंदावल्या लेशही
चर्या शान्त, गभीर, मौन बसलें ओठांवरी येउनी
वृत्ती नम्र विनीत ही परि किती बोलून दावी स्वयें !

याचें जीवन मूर्त तें हवन कीं देशार्थ चाले सदा
गेले सर्व सुखोपभोग जळुनी केव्हांच ज्वालेंत त्या.
चित्तींच्या मृदु भावना सकलही मातेप्रती अर्पुनी
तीच्या दास्यविमोचनार्थ झटतो हा वीर रात्रंदिन !

मी खद्योतच क्षुद्र—तूं झळकसी तारा स्वयंतेज रे
माझें मस्तक वांकतें तुजपुढें वीराग्रणी आदरें !

# ओढ

[ गझल : साकी ]

राञ काळोखी अतां विश्वांत साऱ्या दाटलेली
ओढ माझी लागुनी आलास ना ऐशा अवेळीं ?
म्लान झाल्या चांदण्या या ढाळिती अश्रू दंवाचे
झोंबतां वारे थरारे जाइची नाजूक वेली !
कोर चन्द्राची उसासे टाकिते मेघांमधूनी
वेदना माझीच वा कोणी नभीं वाहून नेली !
विश्व सारें शान्त झालें, झोंपली ही वृक्षराजी
श्यामला पंक्ती गिरींची दूर शोभे रेखलेली.
ही निशा जीवास माझ्या मूक दे सन्देश कांहीं—
खेद सारा ने हरोनी गोड ही माझी सहेली !
आर्तता माझ्या उरीं, आंसू उभे नेत्रांमध्यें या—
मात्र चित्ताला कळेना लागणी जी लागलेली.
तोंच तूं चालून राया माझिया आलास गेहीं—
काय स्वप्नींचीच माझ्या मूर्ति ही येथें उदेली !
जाहली होती मलाही त्वत्स्मृती आतांच ना रे ?—
गूढ ती संवेदना होती तुला का पोचलेली ?
राजसा ! वक्षावरीं तूझ्या मला घे ओढुनीया
वेळ साजे ही कराया प्रीतिच्या विश्रब्ध केली !

# जा जा कविते

जा जा कविते ! नलगे आतां मजला तव सहवास
तोडूं दे मज कोमलतेचा अखेरचा हा पाश !
कठोर, निष्ठुर जगामध्यें या स्थान नसे स्वप्नांस
तुझ्यामुळें परि मजभंवतीं हा स्वप्नांचा आभास.
विषण्णता, क्रूरता बसे या जगताला व्यापून
आनंदांतच मला परी तूं ठेविलेंस रमवून !
मोहक कोमल बिसतन्तूंनीं बद्ध तुवा मज केलें
पंक भोंवतीं दाट पसरला, तें नच मातें दिसलें.
तुझिया सांन्निध्यांत देखिलें नन्दनवन उत्फुल्ल,
फुलांचीच अन् घेऊं लागलें मन भंवतीं चाहूल
फुलें न दिसलीं, मात्र विखरले कण्टक चहुंबाजूला—
चरणीं रुततां जीव दचकुनी भानांवर हा आला
मिटल्या नयना तुवा दाविलें इन्द्रजाल रमणीय,
नेत्र उघडितां क्षणार्धांत तें गेलें विरुनी हाय !
प्रत्यय ज्यांचा कधीं न येई वास्तव या विश्वांत—
स्वप्नें तीं दावून आमुचा करिसी कां गे घात ?
या स्वप्नांची संपुनि रजनी येवो प्रखर प्रकाश
जा जा कविते ! नलगे आतां मजला तव सहवास !

## चांदणें भंवतीं

[ अभंग ]

चांदणें भंवतीं पडलें सुंदर
तरी हुरहूर लागे मना.
निःस्तब्ध शांतता भरली दिशांत
शून्य आसमन्त होय सारा.
भव्य राजपथ रहदारीविण
दिसती भयाण दृष्टिलागी.
सुंदर तरी हें चांदणें देखून
चित्त उदासीन कसें होई ?
शान्तता एकान्त पाहतां सभोतीं
अन्तरंगीं भीति दाटतसे.
भयद कल्पना उभ्या डोळयांपुढें
आणि धडधडे ऊर माझें.
शुभ्र चांदण्याच्या जणूं या वस्त्रांत
झांकियलें प्रेत जगताचें !
वायूच्या लहरी स्फुंदतात वाटे
प्रतिध्वनि उठे माझ्या मनीं
तरूपर्णांतून सळसळे वारा
जीवास निवारा कुठें माझ्या ?
कुणी न सांगातीं ज्याच्या वक्षावर
ठेविन हें शिर निश्चिंत मी.
तुझाही होईना प्रभो साक्षात्कार
मनालागीं धीर द्यावयाला.
—चांदणें भंवतीं पडलें सुंदर
आणि हुरहूर माझ्या मनीं !

# अखेरची आहुति

अखेरचा यज्ञांत अर्पिला आज हविर्भाग !

जीवन भंवतीं होतां विकसित
चित्त जाहलें माझें प्रमुदित
उसळुनि उठले तारुण्यांतिल मधुर रंग-राग

गूढ, तरल, लाजऱ्या कल्पना
कोमल, उज्ज्वल, मुग्ध भावना
होमुनि साऱ्या पेटविला हा प्रीतीचा याग !

जाळुनिया मम अवघें जीवित
अग्नी हा ठेविला प्रज्वलित
कणाकणानें सर्वस्वाचा केला मी त्याग.

पेटविलें मी प्रथम जियेला
प्राणहि जीवर लुब्ध जाहला
माझिच आतां आहुति घ्याया सजली ती आग !

मुग्धमनोहर तेज लोपुनी
ज्वाला गगनीं उठल्या भडकुनि
सूड मजवरी घेइ अतां तो कोमल अनुराग !

यज्ञदेवते ! तव वेदीवर
समर्पिलें हृद्रत्न मनोहर
आतां तरि निष्कण्टक होवो मम जीवनमार्ग !

# माझिया हृदयाचें पांखरूं

माझिया हृदयाचें पांखरूं
अस्थिर, चंचल भारी बाई कसें तया आवरूं ?

निळें निळें नभ येतां दिसुनी
फडफड करितें अधीर होउनि
इवल्या पंखांनींच आपुल्या गगन पाहतें भरूं !

कुठें ताटवा दिसे बहरला;
हर्ष तरी या होइ आगळा
मंजुळ, अस्फुट, कोमल गुंजन याचें होई सुरूं

निज जातीचें दिसतां कोणी
खुळें तयाला बसे बिलगुनी
शब्दहीन भाषेंत आपुल्या हितगुज लागे करूं !

फुलवुनि अपुला मृदुल पिसारा
आसमंत न्याहळीत सारा
वेडावुनि भवतीचा पंजर पाहे मग विस्मरूं !

इवल्या इवल्या याच्या नयनीं
अनन्त स्वप्नें बसलीं फुलुनी
माधुरींत त्या कटुता अवघी क्षणांत लागे विरूं !

माझिया हृदयाचें पांखरूं
अस्थिर चंचळ भारी बाई कसें तया आंवरूं ?

# प्रवासानंतर

वादळ सरलें आली अन्तीं नाव बन्दरांत !

किती संकटांतून रखडली
किती तुफानांसवें झगडली
प्रचण्ड लाटांवरी राहिली नाचत दिनरात !

कधीं प्रसरला तिमिर सभोतीं
समोर नव्हती दीपज्योती
तमांतही त्या धैर्यें अपुला आक्रमिला पंथ !

जलकन्येच्या कधिं स्मितजालीं
कधिं मृत्यूच्या दंष्ट्रेखालीं
गवसे क्षणिं तरी तयांतूनही जाहलीच मुक्त

धैर्य अतां परि सरलें सारें
फाटुनिया गेलीं अवजारें
दर्यावरच्या मर्दुमकीची हौस होय लुप्त !

हातहि थकले वल्हीं मारुनी
शिणला जीवहि प्रवास करुनी
आणि लागले किनाऱ्याकडे डोळे हे श्रान्त

पुढें दिसतसे आज किनारा
ज्योतींनीं झगमगतो सारा
मानवतेचा कोलाहल अन् शिरतो कानांत

दूर आणि दिसते जनवसती
मिळेल का तेथें विश्रान्ती
शाश्वत वादळ या हृदयांतिल होईल का श्रान्त ?

# तुझी माझी दृष्टादृष्ट

[ छंद : देवीवर ]

तुझी माझी दृष्टादृष्ट झाली आंब्याच्या राईंत
तरूवरी कोकिळेच्या कण्ठीं फुललें संगीत
धुन्द सुगंधाच्या धारा ओतूं लागला मोहर
मत्त माझिया मनाला पडे जगाचा विसर !

तुझी माझी दृष्टादृष्ट झाली नदीतीरावरी
आणि उठल्या जळांत स्निग्ध सुंदर लहरी
येतां झुळुक वाऱ्याची तृण गेलें आन्दोलून
झालें रोमांचित मीहि विसरलें देहभान !

तुझी माझी दृष्टादृष्ट झाली देवाच्या राउळीं
हृदयींच्या गाभाऱ्यांत लाख ज्योत उजळली
पाषाणाच्या मूर्तीमध्यें स्फुरे चैतन्य आगळें
माझ्या मनोवीणेवरी गोड गीत झंकारलें !

तुझी माझी दृष्टादृष्ट झाली पाणियासी जातां
आणि कटीवरचा हा घडा राहिलाच रिता
नकळत आला खालीं माथ्यावरचा पदर
फुलें उधळूं लागले भंवतीचे तरुवर !

तुझी माझी दृष्टादृष्ट झाली पाऊसकाळांत
शतधाराच्या वर्षावीं होती धरणी नाहत
लवलवती बिजली झणीं बिलगे मेघाला
तुझ्या माझ्या मीलनाचा तिनें देखिला सोहळा !

# अनुताप

[ जाति : समुदितमदना ]

कधीं न होइल तुझें आगमन आतां माझ्या घरा
तव चरणांच्या स्पर्शें कधिं नच उजळणार उम्बरा !
मधुर तुझे निःश्वास यापुढें दरवळणार न इथें
प्रकाशपुष्पें फुलवाया नच येतिल मंदस्मितें !

तुझिया रूपें प्रभु प्रकटला दीन झोंपडींत या
गाढ खिन्नता इथें दाटली विलयातें न्यावया
तव तेजानें विरून गेलें तम सारें येथलें
आणि माझिया दारिद्र्यासहि सौभाग्यच लाधलें !

प्रेमळ दृष्टि तुझी राजसा ! लागतांच मजवरी
चैतन्याची लहर उसळली अवघ्या देहान्तरीं
ओसण्डत जणुं अमृत होतें तुझिया गात्रांतुन
तव ओष्ठांच्या स्पर्शें हृदयीं फुललें नवजीवन !

मी न तुला जाणिलें परन्तु परमेशा वत्सला
आणि कितीदां करुन धिटाई तुजला अवमानिला !
क्षुद्र अहंभावना बैसलें कवटाळुनिया उरीं
अभागिनीला तुझ्या दयेची कळली नच माधुरी !

आज परी गेलास अचानक घर माझें सोडुनी
मंगलता, पावित्र्य, हर्षही गेलीं तुजमागुनी !
तेजोमय तव अस्तित्वाचा लोप यदा जाहला
खिन्न, गाढ तम फिरुनी माझिया भंवती हा दाटला !

आणि तमीं या तुला शोधिती बाष्पाकुळ लोचन—
स्मरून हीं आंसवें पुन्हां नच देशिल का दर्शन ?

## दावूं कशाला बोलून ?

[ छंद : देवीवर ]

काय माझ्या अन्तरंगीं दावूं कशाला बोलून ?
आणि बोलुनीया काय भाव येतील कळून ?
तुझ्या दर्शनानें कसा जातो उल्लसून जीव,
कसें बहरून येतें माझ्या जीवाचें राजीव,
कशी हृदयांत माझ्या होते धडधड सुरू,
कसें लागतें देहांत नवजीवन संचरूं—
वृथा कशाला हें सारें दावूं मांडून शब्दांत ?
आणि सामर्थ्यहि तसें कुठें आहे या वाणींत ?
माझें अन्तर कोवळें माझी वाणीही दुर्बळ
प्रीति निष्पाप अथांग इतुकेंच माझें बळ
उमटले भाव जर कधीं माझ्या नयनांत,
स्पर्शांतून उसळला किंवा भावनेचा स्रोत—
तर घेई तूं जाणून काय आहे माझ्या मनीं
स्वयें कधींच मी मात्र दावणार ना बोलुनी !
भाव कोवळे नाजूक जणूं प्राजक्ताच्या कळ्या
स्पर्शानेंही कोमेजून त्यांच्या जातील पांकळ्या !
भाव कोंवळे नाजूक जणुं फुलांचे पराग
कशी सोसेल तयांना बाह्य किरणांची आग ?
गूढ सदा राहो भाव माझ्या मनीचा आगळा
काय सागरानें कधीं रत्नें दाविलीं जगाला ?

## मध्यरात्रीं

नीरवतेचें घुंगट घेउनि विश्वावरतीं जैं ये रजनी—
चंचल चरणीं कुणी तेधवा येतें नित माझ्या सदनीं
गहन अन्धकारांत कुणाचं मधुर रूप हें झळझळतें ?
कुण्या बांसरीची स्वरमाला तरळत वाऱ्यावर येते ?
मन हो आतुर, दर्शनतृष्णा लागुनि राहे हृदयासी,
अन्तर्हित त्या ' कुणा ' स करिते परंतु घन ही तमराशी !
सुगन्ध येई, फूल परन्तु कधीं न दिसतें हें नयना—
जादुगार हा कधीं न रिझवी देवुनिया दर्शनदाना
प्यारी मनमोहनी सुमंगल मूर्ति कधीं ती दिसेल का ?
चित्र मधुर तें हृत्फलकावर रेखाया कधिं मिळेल का ?
क्षणभर जरि तो श्याममनोहर दिसेल या मम नयनातें—
बद्ध करुनिया हृदयमंदिरीं सदैव ठेविन मी त्यातें !
हे प्रभु ! मजला एकवेळ तरि रूप सांवळें पाहूं दे
तमोव्याप्त या हृदयीं सुंदर चिन्मयज्योती उजळूं दे !

# मूर्तिपूजक

[ गझल : देवप्रिया ]

“ पत्थराच्या मूर्तिला हा पूजितो वेडाखुळा,
आळवीतो गाउनी अन् घालितो माळा गळां ! ”
तार्किकांनो ! कां असें हें बोलतां टोंचूनिया ?
भाव माझ्या अन्तरींचा जाणुनी घ्या आगळा !
पत्थराची मूर्ति ही ना हांसते, ना बोलते,
चेतना नाहीं मुळीं, हें सर्वही ठावें मला !
मात्र ज्या सद्भावना चित्तामध्यें हेलावती—
सर्वही त्या वाहुनी मी वंदितों या देविला !
भावना नाहींत का हो श्रेष्ठ त्या तर्काहुनी—
पत्थराही अर्पिती ज्या ईशरूपाची कळा ?
देखिलें सौन्दर्य जें जें अन्तरीं, विश्वान्तरीं—
सर्वही मूर्तीत या तें ये दिसोनी दृष्टिला !
अन्तरंगीं माझिया ओथंबली जी भावना
ओघ तीचा मूर्तिमाजीं या असे मी ओतिला !
आणि त्या मद्भावनांचें चाललें हें पूजन,
वन्दितो ना मी मुळींही पत्थराच्या मूर्तिला !
वाटतो, वाटो तुम्हा निर्जीवही पाषाण हा
माझिया दृष्टीस ही देवीच भासे मंगला !
पूजनीं तिच्या सदाही रंगुनी जाईन मी
बोलतां मातें जरी उपहासुनी वेडाखुळा !

## फसवणूक

[ चाल : लावणीवजा ]

कां आस लावुनी अशी पाडली फशी खुळ्या पोरीला ?
देऊन पिर्तिचं उसं ढकललं कसं दूर तूं मजला ?
लावून जिवाला घोर माझिया थोर कुठं रे जाशी ?
खांद्यावर ठिवली मान व्हउन बेमान कसा कापीशी ?
' मी तुझाच आजपासुनी ! ' उरीं कवळुनी पिर्तिनं मजला—
तूं दिला शब्द एकदां अतां वायदा कसा रे चुकला ?
मोहरली आंबेराइ कोकिळा गाइ अशा येळला
नदरेला भिडली नदर, उरीचा पदर जरा थरथरला !
भंवतालीं नव्हतं कुनी एकली रानिं पोर देखून
झालास लगी तूं धीट ठयेवली नीट मला रोखून !
' ह्यें नवलाचं पांखरूं दिसाया मारु वाट चुकलं जी ! '
गुणगुणला तूं लावणी जरा पापणी चळना माझी,
निरखून तुला पाहिलं चित्त वाहिलं तुझिया पायीं,
तेव्हांपुन झालें खुळी इसरलें मुळी तुला मी न्हाई !
तूं मात्र लावुनी येड अतां कां तेढ मनीं धरलीस ?
सांगून पिर्तिची कथा गळ्याला अतां लावला फांस ?
जाहला काय तरि गुन्हा म्हणुनिया उणा जिव्हाळा केला ?
कीं कोणी कवटाळीण बसे नागीण वेढुनी तुजला ?
झालया जिवाचं रान, गळ्याची आण घालतें राजा !
ये धांवुनिया लौकर जिवाला धीर द्यावया माझ्या !
दे सजा हवी ती मला ( गुन्हा जाहला असंल जर कांहीं— )
हा असा अबोला परी जिवाला सुरीच रुतते बाई !

# जीवन आणि काव्य

काव्यांतिल जीवनीं रंगलें
जीवनांतल्या काव्या मुकलें !

काव्यपुस्तकें पुढ्यांत घेउनि
वाचनांत घालविल्या रजनी
जीवन तैं जवळीं रेंगाळुनि—
निराश होउनि पुढतीं गेलें !

गर्द निळी मध्याह्न शोभली
तांबुस किंवा उषा बहरली
संध्येची वा धूसर लाली
कधीं न हे रसरंग निरखिले !

सर्व घेउनी गन्धमाधुरी
पवन तिष्ठला माझ्या दारीं
सृष्टी नटली नवशृंगारीं
डोळे भरुनी तिज न देखिलें !

भ्रमर घालितो रुंजि सुमांवर
मधुर गीत गुणगुणतो निर्झर
श्यामल हिरवळ हसते निर्भर
गूढार्थ न त्यांतले उमगले !

प्रियभगिनीचे ओठ कोंवळे
भावाचें वा जावळ काळें—
अधीरतेनें कधिं न चुंबिलें
कधीं न त्या पोटाशीं धरिलें !

## व र्षा

पुस्तकांतले शब्द अचेतन
वाचुन गेलें मन वेडावुन
उरीं उसासे उठले उसळुन
तींच मानिलीं जिवंत कवनें !

अफाट जीवन पसरे भंवतीं
काव्यझरे त्यांतुन पाझरती
तयांत होवो विलीन वृत्ती
निर्जिव कवनां मन हें विटलें !

## नियतीस !

[ छंद : देवीवर ]

मन हें आधीं
मोहपाशांत
तूंच पाडिसी,

आणि नन्तर
अनुतापानें
तूंच जाळिसी.

बघतां ऐसें
उदास मना
वाटते खन्ती—

कांहींच कसें
नाहीं जगीं या
आमुच्या हातीं ?

# कमलिनी !

तुझ्यास्तव हृदयकोष उमलला
मधुभावांचा मरन्द घे हा लुटुनिया त्यांतला !

रंग लेवुनी अभिनव सुन्दर
खुलल्या या पाकळ्या मनोहर
तुझाच मधुपा हा रसनिर्झर
फुले कमलिनी तुजसाठीं ही, प्रणयराग रंगला !

कोषांतून दरवळला परिमल
थरथरती हे पराग कोमल
मधुबिन्दु ठिबकती सुनिर्मल
अपार यौवनभर हा साहुनि जिवास लागति कळा !

अन्तरंग मी बसलें खोलुनि
रुंजी घालित येइ धांवुनी
मधुसंभारा ने या लुटुनी
सार्थकता नच वैभवास या तुजविण, ठावें मला !

नीरस होइल रसमय यौवन
मधुवैभव हें जाइल संपुन
तूंही अन्तीं जाशिल सोडून
ज्ञात मला हें, तरि ये ! तुजविण निष्फळ जीवनकळा !

# बोलुनी दावूं नको !

[ गझल : देवप्रिया ]

जे स्फुरे ओंठावरी तें बोलुनी दावूं नको
गूढ या हर्षास आतां म्लानता आणूं नको !

प्रीतिची शद्बाविणें का होत नाहीं सांगता ?
अन्तरीं जें लीन त्यातें व्यक्तता देऊं नको !

प्रेम तूझें वांचुंदे नेत्रींच तूझ्या प्रेमळा—
मूक जें शोभे तया वाचाळता आणूं नको !

शद्ब सारे बापुडे हे अर्थ ना सामाविती,
स्वैर जें चारुत्व त्यातें बन्धनीं कोण्डूं नको !

तूझिया स्पर्शामधूनी भावगंगा वाहते—
या समाधींतून आतां जाग तूं आणूं नको !

# राधा

यायचा जिवलग आज घरांत !
जारे सूर्या ! कां घुटमळसी गगनाच्या दारांत ?
कळे न का तुज उत्सुकता मम येइल केव्हां रात ?
येतां रजनी चन्द्रतारका उमलतील गगनांत—
हृदयींच्या नीरांजनिं उजळे आशेची फुलवात !
जाइजुई ओथम्बुनि गेल्या धवलरम्य बहरांत—
लेवुनि मी श्रृंगार विनटलें गभीर उन्मादांत !
प्रिया ! तुझ्यास्तव दीप फुलाविले घन या अन्धारांत—
हार गुंफिले, परिमळ त्यांचा भरला अखिल दिशांत !
कुंजवनींच्या आठवणींचा मादक दाह उरांत—
सलज्ज येथें उभी राहिलें तुझीच वाट पहात !
ये प्रियसखया ! श्याममोहना ! ये ये जीवननाथ !
तुझ्यावांचुनी तृषार्त मी या भरल्या संसारांत !
शाश्वतता ये अशाश्वतीला दिव्य तुझ्या स्पर्शांत
येइ राजसा ! अधीर राधा घेइ बाहुपाशांत—
अखिळ विश्व मग जाइल बुडुनी त्या प्रीतिप्रलयांत !

# एक जलसंचय

[ जाति : समुदितमदना ]

स्थगित जाहलें जीवन, येथें कसली ना खळबळ,
मुळीं तरंगित होईना हें गढूळलेलें जळ !
पराग भंवतीं उधळित येथें कमळ फुलेना कधीं
क्रीडाचंचल हंस न उठविति लहरी स्थिरतेमधीं
मधुर आपुलें रूप देखुनी करण्या मनरंजन
उषासुन्दरी कधीं न घेई करांत हा दर्पण !
शान्त तारका कधीं न होती जलांत या बिंबित,
तरल वायुनें हृदय न याचें होई रोमांचित.
उदासवाण्या शैवालाचें पडलें अवगुण्ठन
एक पारवा क्वचित् येउनी करितो आक्रंदन !
निबिड तरूंच्या खिन्न सांवल्या बसलेल्या वेढुनी
निळीं लव्हाळीं एकदोन वा बघती डोकावुनी,
थाटुनिया संसार बैसली आणि कुणी मासळी,
याविण दुसरी हर्षशलाका नाहीं येथें मुळीं !
काय अर्थ तरि आहे सांगा निर्जिव या जीवना—
हास्याची वा अश्रूंचीही उत्कटता जेथ ना !
उसळुनी जावें जीवन अवघें तुफान घन येउनी
ग्रीष्मानें वा समूळ जावा संचय हा आटुनी !

## गडे ! जाणतों हृदय तुझें

गडे ! जाणतों हृदय तुझें, पण—
कठोर बहु भंवतीचें जीवन !

पुनःपुन्हां मम कवन वाचिशी
ध्वन्यर्थाचे पदर उकलिशी
अन्तरांगिं वेडावुन जासी
रसिके ! करिसी अस्फुट गुन्जन !

स्नेहभाव डोळे न लपविती
प्रतिवचनांतुन स्फुरते प्रीती
हृदय तुझें अव्याज सखे किति
वृत्ति तशी मी आणूं कोठुन ?

सलगी लोभस मज आकळिते
( शब्दांविण कां हृदय न कळतें ? )
माझेंही मन बघ तळमळतें
व्यर्थच परि सारेंही उमगुन !

उभय करांनीं उधाळित भंवतीं
मृदु भावांचे माणिक-मोती
उदारशीले ! आलिस पुढती
दान घ्यावया परि मी मुक्त न !

तशांत जर कां चळेन रतिभर
तरि जगताचे नेत्र कठोर
नित्य लागले बघ आम्हांवर
नीतींचें तर दृढतर बंन्धन !

प्रेमळ जीवा ! उधळुं नको तर
मुग्धभाव अपुले वाऱ्यावर
तुझ्या नि माझ्या हृदया आवर
अगतिक बघ मी, जा जा येथुन !

# विस्मयमुग्धेस

[जाति : नववधू]

साखि ! पाऊल कां तव अडखळलें ?
कां नयन अचानक बावरले ?

राजमार्ग हा, पथ नच निर्जन
अवती भंवतीं वावरती जन
थबकासि केवीं मध्येंच दचकुन
जनभीति न तुज संभ्रमशीले ?

टपोर लोचन फिरती गरगर
उत्कण्ठेनें थरथरतें उर
विलग जाहले ओंठहि आतुर
का परिचित कोणी तुज दिसलें ?

मुग्ध हंसें अधरावर फुलतें
सांवरिसी पदरा निज हातें
एकान्तातिल गुपित कोणतें
भर मार्गावर तुज आठवलें ?

कुतुहलें भृकुटी लव चढली
लाडिक रोषें जरा मुरडली
चर्या परि आरक्त जाहली
अनुलक्षुनि कोणा हें सगळें ?

तांबुस शोभा मावळतीची
वरी उसळती कांचनवीची
प्रेमपताका ती नवलाची—
कां देखुनि स्वप्न मनीं फुललें ?

अफाट या जनसंम्मर्दांतून
अचुक दिसोनी ये का साजण
ज्यास्तव हें अनुरागनिबन्धन
ज्या जीवनधनही अर्पियलें ?

# विजेची भेट !

[ छंद : देवीवर ]

काळ्याकभिन्न मेघाचें वक्ष वेगें विदारून
कडाडत विद्युल्लता उतरली वरतून
तिच्या प्रखर दीप्तीनें रान सारें उजळलें
भीरु जगताचे नेत्र क्षण जाहले आंधळे !

× × ×

रूक्ष नापीक विस्तीर्ण होता अरण्यांत माळ
काळ्या पत्थराचें त्याचें होतें हृदय विशाळ
कधीं आली ना त्यावर हिरवळ तरारून
कधीं नाचेना निर्झर पदीं घुंगूर बांधून
मात्र फटींतून कुठें होतीं कुसळें बारीक
दुजी यावीण माळाला नसे सोबत आणीक !

× × ×

गगनींची वीज परी आली तेथेंच धांवून
क्षण माळाची त्या चर्या झाली भयानें विवर्ण !
अग्निज्वाला रुद्ररम्य गेली फोडून कातळ
आणि उफाळलें वर तळीं लपलेलें जळ !
डोळे झांकलें जगानें कडकडाट ऐकून
नेत्र उघडितां परी काय येई त्या दिसून ?
रूक्ष नापीक माळाच्या वक्षामधून विदीर्ण !
होती वाहत सुंदर जलवन्ती अविच्छिन्न !
वीज जाऊन भिडतां थेट काळजापर्यंत—
भाव तेथें लपलेले प्रकटले निमिषांत
खदखदा हसूं लागे मग नापीक तो माळ
जललहरी न—त्याचें होतें हास्य तें विलोल !

खोल खोल वाहणारी भावगंगा वर आली
शोभा नन्दनाची आणि माळावर विराजली !

× × ×

एकदांच गेली तया सौदामिनी आलिंगून
तेव्हांपासून तयाचें झालें स्नेहार्द्र जीवन !

## वधूस !

[ छंद : देवीवर ]

दिसलीस प्रथमच अन्तर्पाट होतां दूर
रूप तुझें आहे परी ज्ञात मला पुरेपूर !

पाहतांना सायंकाळीं मिळें गहिरें आकाश
याच अथांग नेत्रांचा झाला होता मज भास !

हिण्डतांना नदीतीरीं नित्य बेहोष रंगांत
तुझ्या स्मरणेंच वीज होती खेळली अंगांत.

रानींवनीं ऐकतांना कलध्वनी निर्झराचा
खुणावीत होता मज नाद तुझ्या कंकणांचा

आणि आर्द्र वर्षाकाळीं कडाडतां सौदामिनी
तुझ्या चुंबनाच्या उर्मी उमटल्या होत्या मनीं !

कधीं अन्तराळांतून भरारतां पक्षिद्वय
तुझ्या अबोध ओढीनें झालें व्याकुळ हृदय

आणि आर्पियलें तूं जें मज अमोल भाण्डार
त्याचा तर युगेंयुगें होत आहे साक्षात्कार !

आजवर प्रतीत जें झालें जलांत स्थलांत
तेंच मूर्त होऊन ये आज नांदाया घरांत !

## स्वप्नांनो !

स्वप्नांनो ! तुमचाच अभागी जीवाला आधार
तुम्हीच त्या सुखविता लेवुनी नवोनव शृंगार !
गहन नीलिमा गगनाचा वा अथांगता सिन्धूची
तारांची घन चमक आणखी आरक्तता उषेची
पुष्पांची मृदुलता—सकलही एकवटे तुमच्यांत
तुमच्या स्पर्शें उजळुन जाते नैराश्याची रात
नसे जीवनीं ज्याच्या उरला हर्षाचा लवलेश
तुम्ही उघडिता तयापुढें नव हर्षाचे उन्मेष.
तरल आपुल्या पंखांवरती तयाप्रती बसवून
तुम्हीच त्याच्या सन्निध करिता भव्य निळें अस्मान
प्रेमळ तुमच्या करस्पर्शेनें लागे जीव हंसाया
नयनांपुढतीं क्षणीं उमलते नवरंगांची दुनिया !
तुमच्यावांचुनि जीवित होईल दुःसह कारागार
स्वप्नांनो ! तुमचाच अभागी जीवाला आधार !

## नवी अनुभूती

ये नवलाची आज प्रतीती
नव्या जीवनीं नव अनुभूती !
नव क्षितिजावर
नवाच भास्कर
नवकिरणांची वितरी दीप्ती
नव भूमीवर
नवे तृणांकुर
नवा तजेला खुलतो वरती
नव साम्राज्यें
नवीं क्षितीजें
नव आकांक्षा मनीं स्फुरविती.
नव्या भावना
नव्या कामना
नव अश्रू, नव हास्यें फुलतीं.
स्वप्नें नूतन
सत्यें नूतन
नवचैतन्यें नटुनि झळकती
सर्व नवोनव
विलसे वैभव
नवजीवन विस्तरलें पुढतीं.
ये नवलाची आज प्रतीती
नव्या जीवनीं नव अनुभूती !

# निसर्ग

रम्य विराजे माथ्यावरतीं
निळया नभाची कान्ती शीतल
हिरवळ पसरे पायांखालीं
सन्निध निर्झर करितो झुळझुळ !

तृणांकुरांवर फूलपांखरें
बागडती किती मुक्तमनानें
आणि कोकिळा आम्रतरूंतुन
कुहुस्वरानें गाई गाणें !

परिमळ मादक चित्तामधल्या
उन्मादाला आणी भरती,
नयनांपुढतीं सहज तदा मग
स्वप्नसुमें हळुहळू विकसती !

निळयाजांभळया पर्वतराजी
उरीं धरूनी निगूढ छाया
युगायुगांतुन पाहत आल्या
स्वप्नसृष्टिची मोहक माया

सृष्टीच्या अंगोपांगावर
नवरंगांची झाली उधळण
कृष्णसख्याला भेटायाला
जणूं चालली कोणी गौळण !

वर्षांमागुनि वर्षें जावीं
अशीं जीवितांतून संपुनी,
अखेरचे निःश्वासहि अमुचे
विलीन व्हावे वातावरणीं !

अशी निसर्गासंन्निध वसतां
जीवनसरिता सन्थ वाहते,
कितीक गेला काळ, तरीही
भान मुळीं ना मना राहतें !

सृष्टीच्या अंकावर अपुला
श्रान्त असा हा देह टाकुनी
निसर्गातली अवीट जादू
श्वासें घ्यावी मनीं भरवुनी

सांजवेळ आरक्त येत मग
उरीं उपजवी गूढ आर्तता
उदासवाणे, अबोधसुंन्दर
विचार जाती स्पर्शुनि चित्ता !

असाच जातां दिवस संपुनी
चोरपाउलीं येते रजनी
नवतेजाचे हीरकमोती
काळोखाच्या पोटीं भरुनी

जीवसख्याच्या करीं गुंफुनी
कर अपुला विश्रब्धपणानें
मध्यरात्रिच्या नीरव समयीं
गावीं मग निःशब्द गायनें !

विशाल जीवन निसर्गांत जें
भरुनि राहिलें, राहिल पुढतीं
जीवितबिन्दु क्षुद्र आमुचा
विलीन व्हावा तयांत अन्तीं !

# एकली !

[ जाति : कोकिळा ]

सदाच मी एकली जीवनीं सदाच मी एकली
अफाट जीवनमार्गावरतीं
जरी शोधिल्या किती संगती
दुरावल्या त्या सकलहि अन्तीं
साथ द्यावया अतां राहिली केवळ मम साउली !

खिळवुनि नयन कुणाच्या नयनीं
रंगुनि गेलें स्वप्नरंजनीं
स्वर्गासम ही गमली अवनी
जागृति येतां गाढ तमानें मनोभूमि व्यापिली !

कुणासवें हास्यांत रंगले,
कुणासवें अश्रूहि ढाळिले,
कुणासवें जग नवें देखिल
ती नवलाची सृष्टि माझी आज कुठें लोपली ?

वसन्त केव्हां भंवति बहरला
वर्षर्तुहि वा शिरिं कोसळला
तरी जीव हर्षानें फुलला
आज मात्र शिशिरानें काया बधिर हाय ! जाहली

नको उभविणें नूतन सृष्टी
नको व्हावया फिरून कष्टी
अन्तर्मुख नित राहो दृष्टी
एकान्तांतच संपुनि जावो जीवाची काहिली !

# पुलावर

[ जाति : भूपतिवैभव ]

पोकळीं नभाची वरती नील विशाल
पाण्यावर होतें शशिकिरणांचें जाल.
कोनांत पहुडल्या होत्या निश्चल छाया
अन् भंवतीं नव्हती कोणाची चाहूल.
आणखी पुलावर होतों आपण दोघे
—निद्रिस्त अखिल जग, कुणीच नव्हतें जागें !
हळुंहळू बोललों अस्फुट कांहीं कांहीं
तों अन्तरि पाउल ठेवियलें अनुरागें
प्रीतीचे माझ्या अन्तरांत उन्मेष—
तरळले, परी तूं स्तब्धच आणि उदास
मिळविलीं आर्त लोचनें माझिया नयना—
अन् उदासीनता ये माझ्याहि मनास !
नेत्रांत तुझ्या तें तरंगलें जें गूढ
क्षणभरी तयानें झालें मीही मूढ
तव संयम गमला रम्य चुंबनाहून
त्यानेंच लाविलें जीवा माझ्या वेड !
शोधितें क्षणाचा उत्कट मी उन्माद
तुज भाविकालचा दिसे परंतु विषाद.
तव गभीर, संयत सरलपणाचे माझ्या—
उन्मत्त उरींही उठले मग पडसाद.
ना तरंगलों जरि मत्तमादिर भावांत
तरि आर्त जिव्हाळा दाटुनि ये हृदयांत.
जा विसरुनि माझ्या चंचल अवखळतेला
नयनींचे अश्रू ठेव परी ध्यानांत !

# माझा मार्ग

[ सुगीत : शार्दूलविक्रीडित ]

मी तों वीज नभांतली, मजवरी घालाल का बन्धनें ?
होतां खिन्न उगाच कां बघुनिया हें स्वैर माझें जिणें ?
आहे दारुण योग हा—न समजा निर्विघ्न ही स्वैरता—
या आगींत जळूनिया बहर ये काव्यास माझ्या जिता !

वाटो जीवित तें सुरक्षित तुम्हां त्या चार भिंतींतलें—
हीं मातें रुचतीं परंतु, उठतीं जीं भोंवतीं वादळें !
येते उत्कटता क्षणासहि किती; ती आगळी माधुरी—
लागे वेड कधीं तुम्हास धरुनी उन्मत्तता ही उरीं ?

या मार्गावर भेटती कधिं कधीं स्वप्नें मनोवेधक,
उद्यानें फुलतीं कधीं, वरसतो अग्नीहि वा दाहक !
तो प्रासाद निवांत स्वास्थ्य कितिही देवो तुम्हालागुनी—
मी वेड्यापरि हिंडणारच सदा या गर्द राईंतूनी !

ठेवा कोंडुनि वाटल्यास रसिका ! ही सारिका पंजरीं—
येतां देह करीं सुकेल परि ही कण्ठांतली निर्झरी !

# हींच गीतें वाचुनी

[ गझल : देवप्रिया ]

हींच गीतें वाचुनी तैं जाहलें बेहोष मी,
बांधिती जीवास आतां पाश ना ते रेशमी!
गन्ध पुष्पांचा उडाला, शीर्ण झाल्या पाकळ्या
पाहतां निर्माल्य हातीं, जीव वेडा हो श्रमी.
निर्मुनी स्वर्णच्छटांची द्वारका मेघांमध्यें
सांध्यदेवा क्रूरतेनें लोपुनी गेली तमीं.!
आणि अंधारींच आतां रोखुनी दृष्टी नभीं
अश्रु नेत्रीं दाटलेले मी प्रयत्नें संयमी !
विश्व तेव्हां भासलें हें रम्य उद्यानापरी
क्रूरता त्याची जिवाला आज पाडी सम्भ्रमीं !
लुप्त झाले शैशवींचे भाव हर्षोत्फुल्ल ते—
मुग्धतेला त्या परन्तू काय द्यावा दोष मी ?
इन्द्रजालें रंगलीं नेत्रांपुढें जीं तेधवा
काय तीं जाया विरोनी मात्र कालाच्या क्रमीं ?
कल्पनेनें याच जीवा दुःख आतां वाटतें-
हाय ! सौन्दर्यासही मृत्यूच यावा नेहमीं !

# माझा गांव

[ जाति : लीलारती ]

मम मायभूमिचें रूप बघुनि भोंवतीं
अजुनीहि जाय हो वेडावुनि मन्मती
मी याच शिवारामध्यें जन्म घेतला
तो ठसा मनावर नित उमटुनि राहिला !

दिन इथेंच गेले मुग्ध शैशवांतले
या भूमीवर मी बागडलें नांचलें !
या निसर्गसौन्दर्यांत जीव रंगला
मज अवगत हो सौन्दर्यसमीक्षणकला !

आक्षितिज पसरल्या नीलवर्ण टेकडया
मेघांच्या छाया ज्यांवरतीं वांकल्या.
मधुनीच दाट राहटया तयांच्या तळीं
देखून जयांना स्वप्नें मनिं रंगलीं !

भोंवतालच्या विस्तीर्ण शिवारांतून
हो हरित्सृष्टचें सदारुचिर दर्शन
तरुंतुनी खगांची किलबिल मधु चालली
ती कान देउनी कितिदां मी ऐकली !

मी शेतांमधल्या पाउलवाटांतुन
हिण्डलें कितिकदां होउनिया उन्मन
बान्धावर चिमणीं रानफुलें डोलती
पाहून तयांना विस्मित झाली मती !

कधिं स्वैर विहरतां आंबेराईंतुनी
हरखलें गन्ध तो उन्मादक सेवुनी
कधिं बकुळफुलांचे विरल गुच्छ जमविले
कधिं चाफ्यावरतीं चढुनि जिवा रिझाविलें !

या लिम्बाऱ्यावर पाहुनिया मोहर
त्यासवें मोहरून गेलें मम अंतर
या विनयशील बाभळी बालिका गुणी
शैशवीं जाहल्या माझ्या प्रिय मैत्रिणी !

कोंवळ्या तृणावर बागडलें हर्षुनी
गुंगलें नदीचा कलध्वनी ऐकुनी
झगमगत्या तारा टक लावुनि पाहतां
निद्रेच्या राज्यीं शिरलें मी नकळतां !

तो बालपणाचा मुग्ध काळ संपला
काळज्या किती वेढितात आतां मला
परि अजूनही मी येतां केव्हां इथें—
या सौंदर्याशीं समरसता पावतें !

ही मधुर अनागस यक्षभूमि केवळ
पाहतां किती हो अन्तरांत खळबळ !
पूर्विच्या स्मृतींचीं किलबिलतीं पांखरें
मन खिन्न होउनी जरा आंत हुरहुरे !

## वृथाच !

[ जाति : छन्द ]

वृथाच मी जीवनाचा चालविला अट्टाहास
श्रेय कांहीं ये न हातीं, मन मात्र हो उदास.
कांहीं अमूर्त ध्येयांचा वेध सारखा घेऊन.
कापीतसे जांव उगा वाळवंट हें वैराण.
तहानेनें व्याकळून टाकितें मी येथ धांपा
आणि भोंवतीं उठती मात्र ऊन ऊन वाफा !
शैशवीचीं निरागस स्वप्नें पूर्ण मावळलीं
व्यवहारवादामध्यें होय जीवाची काहिली.
' माल हवा तो उचला पैसा देउनिया रोख ! '
असा येथल्या जगाचा व्यवहार रोख ठोक
भावनांची कोमलता इथें कुणास ना ठावी—
अन्तरीचीं दु:खें मग कुठें बोलून दावावीं ?
माझें मीच घेतलें हो मरण हें ओढवून
ध्येयें दूरच राहिलीं, आयु चाललें सरून
भवितव्यता कठोर वेडावून दावीतसे—
आणि मूर्खपणा माझा जग बघे उपहासें !

# हे प्रिय रसिका !

हे प्रिय रसिका ! दुर्बल मी तर
तूंच जाणुनी घे मम अन्तर !

हृदयि कधीं मधुभाव उसळती
गीतसागरा येते भरती
ओठावर परि लहरी अडती
बाहिर फुटतो अस्फुटसा स्वर.

उत्कंठेनें दाटुन ये उर
व्यक्त कराया मन हो आतुर
शब्द गवसती परी न सत्वर
कशीं रचूं मग कवनें सुंदर ?

विविध वर्णमालिका लेवुनी
चित्रें उमटति मनिं रात्रंदिनिं
वाटे दावावीं तुज रेखुनि
कलावन्त परि नच तितुका कर.

स्वरलहरी निज पंख हालवित
मनोवितानीं येती विहरत
पकडुनि वाटे ठेवाव्या द्रुत
उडुनि जाति परि लावुनि हुरहुर !

सुगन्ध भरला उरिं उन्मादक
उमलाया ही कलिका उत्सुक
असह्य होई तुजविण हें सुख
उन्मीलन परि सखया ! दुष्कर

कला मूर्त मी, तूं मम प्रियकर
माझ्या नवतीचा तूं शाहिर
अधुऱ्या गीतांमागिल निर्भर--
भावपूर घे जाणुनिया तर !

# माझी कमळें

[ जाति : बालानंद ]

मम हृदयाच्या कासारीं
कमळें फुलतीं परोपरी
शीतल शय्या लहरींची
वर चाले क्रीडा यांची
निळीं जांभळीं
ताम्बुस, पिंवळीं
रंग तयांचे विविध किती
पाहुनि हर्षा ये भरती !

लाजतसे कोणी कलिका
लज्जेचा तो रंग फिका
फुलुनि कुणी वा उद्दाम
गंध उधळिते बेफाम
डुलते कोणी
खुलते कोणी
कुणी मुरडुनी आंत वळे
करी असे चंचल चाळे !

खिन्न कधीं हें मन होतां
उदासता भंवतीं दिसतां
जाणिवेंतुनि परत फिरे
मन या एकान्तांत शिरे

शीतल शान्ती
वसे सभोंती—
कमळें माझीं नाचुनिया
ताप लाविती विसराया !

संगत माझ्या कमळांची
सीमा केवळ हर्षाची
वैभव हें बघुनी माझें
देवहि स्वर्गींचा लाजे
हीं मम दौलत
कुणा न माहित—
जगताच्या नजरेआड
फुलतें हें माझें वेड !

# सार्थक

[ जाति : छन्द ]

माझिया जगाचा
गहन नीलिमा
निरभ्र नभांत
शीतल चंद्रमा

माझिया गांवाला
वेढिती डोंगर
वेशीच्या बाहेरी
शोभतें मंदिर

माझिया शिवारीं
कोंवळी हिर्वळ
वाहते मधून
सरिता निर्मळ

माझिया नदीचें
अथांग जीवन
पिऊन पिकें हीं
डोलतीं प्रसन्न !

माझिया दाराशीं
लिम्बाची साउली
शीतल छाया दे
मायेची माउली !

माझिया घरांत
स्नेहाचे किरण
अवघा संसार
सफल, संपन्न !

माझिया संसारीं
प्रेमळ संगत
उजळे रजनी
सख्याच्या मिठींत

माझिया जीवनीं
सुख ना सामावे
माझिया लोचनीं
कृतज्ञ आंसवें !

# माझ्या कविते !

[ जाति : पादाकुलक ]

प्रिय सखये ! तव संगतींत मीं
रंगविलें अवघें मम जीवन,
स्निग्ध जिव्हाळा तुझा लाभतां
पाझर फुटले पाषाणांतुन !

हर्ष उरीं दाटून जधवा
मधुर भाव उसळले मन्मनीं
त्या भावांची अखिल माधुरी
तुझ्यामध्यें मी दिली ओतुनी !

दुःखाचा कटुचषक घेउनी
नियती येतां माझ्या दारीं
सखे ! तुजमुळें सुसह्य झाली,
दारुण ती कटुताही सारी

आणि जधवा उजळित जीवन
प्रीतिरवी हृदयांत उदेला,
सलज्जेतेनें तुलाच तेव्हां
हृदयींचा उन्माद कथियला !

हर्षखेद वा गूजें मनिंचीं
मूक लाजऱ्या मनोभावना
लपावियल्या ज्या जगापासुनी
प्रकटाविलें तुजपुढतीं त्यांना

बाह्य जगाला विटुनी जेव्हां
चित्त होतसें हें अन्तर्मुख,
शीतलता तैं जिवा लाभते
बोल तुझे श्रवुनी सुखकारक !

जेथें कण्टक पथीं पसरले
तुवा तिथें फुलबाग फुलविली !
अमूर्त माझीं सारीं स्वप्नें
तुझ्यामध्यें गे मूर्त जाहलीं !

जीवनमार्गावरतीं क्षणभर
येती जाती किती सुहृज्जन,
सखे ! आपुला युगायुगांचा
स्नेह परी राहील चिरन्तन !